# भगिनी निवेदिता

## [ अल्प-परिचय ]

भगिनी निवेदिता यांचें नांव पुष्कळ नवभारतियांस माहीत नसतें. ज्या ज्या वेळेस विद्यार्थ्यांजवळ मी निवेदितादेवींचें नाव काढलें, त्या त्या वेळेस ते विचारीत, ' या निवेदिता कोण ? ' ज्या विदुषीनें ब्रह्मचारिणी राहून भारताची शेवटच्या श्वासापर्यंत सेवा केली, तिचें नांव माहीत नसणें ही कृतघ्नता आहे. दुःखाची गोष्ट ही की, या थोर सेविकेचें नीटसें चरित्रहि कोणी लिहिलें नाही. ज्या बंगालमध्ये राहून त्यांनी सारें जीवन दिलें त्या बंगाली भाषेंतहि त्यांचें सविस्तर चरित्र नाही. एक लहानसें पत्रकवजाच चरित्र आहे. असो.

भगिनी निवेदिता यांचें मूळचें नांव मार्गारेट ई. नोबल असें होतें. विवेकानंदांची व त्यांची इंग्लंडमध्ये भेट झाली. अमेरिकेंत अद्भुत विजय संपादून विवेकानंद इंग्लंडमध्ये गेले होते. त्यांच्या व्याख्यानांस हजारो स्त्रीपुरुष जमत. निरनिराळ्या वेळी प्रश्नोत्तररूप चर्चाहि होई. मार्गारेटवर विवेकानंदांची छाप पडली. त्यांचे विचार ऐकून त्यांच्या जीवनांत क्रान्ति झाली. मार्गारेट अविवाहित होती. अनेक शास्त्रांचा तिने अभ्यास केला होता. गणितशास्त्र, इतिहास, समाजशास्त्र, चित्रकला अशा विविधविषयांचें सखोल अध्ययन तिनें केलें होतें.

एके दिवशीं विवेकानंदांस तिने विचारलें, " मी हिंदुस्थानासाठी काय

करूं ? " विवेकानंद म्हणाले, " हिंदुस्थानांत येऊन सेवा करा. हिंदी स्त्रियाना शिक्षण द्या. हिंदुस्थानात भयंकर अज्ञान आहे. सर्वत्र ज्ञान नेण्याची जरूरी आहे. भारतात या. खरेंच या. "

मार्गरेटने निश्चय केला. स्वजन व स्वदेश सोडून ती भारतास येण्यासाठी निघाली ! ज्या हिंदुस्थानला ब्रिटनने लुटलें, त्या हिंदुस्थानची सेवा करावयास ही निघाली. ती हिंदुस्थानांत आली. विवेकानंदाबरोबर हिंदुस्थानभर हिंडली. विवेकानंदापासून ज्ञान घेत होती, अमृत पीत होती, श्रीरामकृष्ण परमहंसाच्या पुण्यकथा ऐकत होती. जीवनात नवविद्युत् संचरत होती

त्या वेळेस हिमालयातील प्रवास चालला होता. मार्गरेट अस्वस्थ झाली होती. पुन्हा इंग्लंडमध्ये परत जावें असें तिच्या मनात आलें चलबिचल सुरू झाली. अनेक प्रकारच्या वैचारिक शंकाहि मनात उद्भवत होत्या. मार्गरेट सचिंत होऊन बसली होती तिकडून विवेकानंद आले. ज्ञानवैराग्याची ती पावनगंगा आली. त्यानी मार्गरेटकडे पाहिलें. ते म्हणाले," चिंता करूं नको " असें म्हणून *त्यानी तिच्या मस्तकावर हात ठेवला. मार्गरेटची समाधि लागली* कितीक वेळाने ती शुद्धीवर आली. अपार आनंदात चुबकळून जणु ती बाहेर आली. थोर अनुभव !

हिंदुस्थानात राहण्याचें ठरलें मार्गरेटचें नाव निवेदिता ठेवण्यात आलें. *निवेदिता म्हणजे अर्पण केलेली निवेदितेने आपल्या जीवनाचा भारतास* नैवेद्य दाखविला श्रीरामकृष्ण परमहंस व विवेकानंद यान्या चरणीं तिने जीवन वाहिलें. निवेदितादेवी आपल्या प्रत्येक लेखाचे खाली " श्रीरामकृष्ण व विवेकानंद याची निवेदिता " असें लिहीत.

विवेकानंद १९०२ मध्ये समाधिस्थ झाले. निवेदिता क्षणभर स्तिमित झाल्या; परंतु त्यान्या जीवनात प्रकाशाचा अमर दीप लावला गेला होता विपन्न भारत समोर उभा होता अन्नहीन, वस्त्रहीन, ज्ञानहीन, स्वातंत्र्यहीन असा हा *महान् भारत त्यान्या डोळ्यासमोर होता त्याच्या सेवेस त्या उभ्या राहिल्या*

*हिंदुस्थानाला त्यानी आपलें मानलें. तुम्हाआम्हाला ही भरतभूमि आपली* वाटत नसेल, इतकी ती निवेदितादेवींस वाटे. आपला हा देश, आपले बंधु असा

शब्दांनी त्या हिंदुस्थानचा व हिंदी जनतेचा उल्लेख करीत. जणु त्या हिंदुस्थानांत जन्मावयाच्या, परंतु चुकून तिकडे गेल्या.

१९०० च्या सुमारासच प्लेगहि हिंदुस्थानांत पसरत होता. कलकत्यासहि ही सांथ गेली होती. निवेदितादेवींनी खूप सेवा केली. कलकत्ता शहरांतील गल्ल्यांतून फार घाण असे. निवेदिता देवी झाडू घेऊन गटारें व रस्ते साफ करीत. एक इंग्रज तरुणी सहा हजार मैलांवर येऊन भारतियांचे रस्ते साफ करूं लागली. आज मिराबाई तेंच करीत आहेत; परंतु आम्ही हिंदी जनता काय करीत आहोंत ?

महर्षि सेनापति बापट नेहमी म्हणत असतात कीं, या देशांत दोन प्रकारची घाण आहे. एक पारतंत्र्याची घाण, व दुसरी अज्ञान व अस्वच्छता यांची घाण. ही दोन्ही प्रकारची घाण दूर करण्यासाठी निवेदिता उभ्या राहिल्या.

भारताला स्वातंत्र्यासाठी उद्युक्त करावयाचें होतें ? त्यासाठी राष्ट्रीयत्वाच्या कल्पनांचा प्रसार करणें अवश्य होतें. तरुणांच्यासमोर राष्ट्रीयत्वाचे तेजस्वी विचार नेले पाहिजे होते. शाळांतून, कॉलेजांतून, वर्तमानपत्रांतून, मासिकांतून– सर्व साधनांच्या द्वारा नवराष्ट्रनिर्मितीस चालना दिली पाहिजे होती. श्री० रोमा रोलां या विश्वविख्यात फ्रेंच साहित्यिकाने विवेकानंदांचें जें चरित्र लिहिलें आहे, त्यांत ते म्हणतात, " विवेकानंद सर्व गोष्टींच्या आधी राष्ट्राचा उद्धार करणारे आहेत. **He is first essentially a nation-builder.** " खऱ्या धर्माचें ज्ञान नसल्यामुळे राष्ट्रास विकलता आली असें विवेकानंद म्हणत. या राष्ट्राचा उद्धार करावयाचा म्हणजे सद्धर्माची कल्पना दिली पाहिजे. व्यावहारिक वेदान्त शिकविला पाहिजे. प्रयोगालयांतील वायु वेदांतील मातारिश्वाइतकाच पवित्र आहे हें पटविलें पाहिजे. भारताच्या विशाल संस्कृतीची, धर्मांतील उदात्त तत्त्वांची भारतीय जनतेस विस्मृति पडली होती, म्हणून वाईट दिवस आले. विवेकानंदाना हा भारत केव्हां मुक्त झालेला पाहीन असें होई. ते म्हणत, " मला एक हजार सेवक द्या; परंतु ते सिंहाच्या छातीचे द्या मी भारताचें रूप बदलून टाकीन." विवेकानंद, ब्रह्मबांधव उपाध्याय व देशबंधु चित्तरंजनदास या तिघाच्या देश-भक्तीस सीमा नाही, असें बंगालमध्ये मानतात. या देशांतील स्त्रियांची, हरिजनांची,

रानटी लोकाची स्थिति डोळ्यासमोर ठेऊन विवेकानंद रात्रीच्या रात्री रडत. असा हा महापुरुष होता. सर्व राष्ट्र चैतन्यमय व्हावें, तेजानें उठावें, ज्ञानानें फुलावें, स्वातंत्र्यानें शोभावें असें त्याना वाटे.

*विवेकानंदान्या मरणानंतर श्रीरामकृष्ण मिशन या संस्थेनें हिंदुस्थानभर* संस्था स्थापिल्या. या संस्थामार्फत शिक्षण वगैरे काम केलें जातें दुष्काळ, पूर वगैरेंत मदत केली जाते दवाखाने चालविले जातात असें हें विधायक काम चाललें आहे, परंतु या कार्यात राष्ट्र उठविण्याची ज्योत नाही विवेकानंदाची ती राष्ट्र उभें करण्याची ज्वाला या कामात नाही एकदा एक थोर सेवक निवेदिता-देवींस भेटावयास गेला होता. भेटल्यावर तो म्हणाला, " आता बेलूर येथील श्री रामकृष्णमिशनच्या मठात जाऊन येतों " निवेदिता म्हणाल्या, "तुम्ही जा तेथे, *परंतु तुम्हाला तेथे विवेकानंद सापडणार नाहीत " याचा अर्थ काय ?* याचा अर्थ एवढाच की, विवेकानंदाचें संपूर्ण दर्शन तेथे होणार नाही. राष्ट्र उभें करूं पाहणाऱ्या विवेकानंदास हे मठवाले पचवूं शकत नाहीत त्या मार्गानें जाऊं इच्छीत नाहीत .

निवेदिता व श्री रामकृष्णमिशन याचे मतभेद झाले निवेदिता स्वतंत्रपणें *काम करीत होत्या. त्याना नवभारत पहावयाचा होता. बंगाली तरुणास त्यानी* राष्ट्रीयता शिकविली कलकत्त्यातील त्याचीं व्याख्यानें मोठीं स्फूर्तिदायक असत एकदा त्या म्हणाल्या, " रामायण व महाभारत का एकदाच लिहिलें गेलें ? नाही रामायण व महाभारत रोज लिहिलें जात आहे त्यात सामील व्हा. राष्ट्राचा नवा इतिहास बनवला जात आहे त्यात भाग घ्या "

*निवेदिता सुंदर बोलत व उत्कृष्ट लिहीत. त्याच्या लिखाणात एक प्रकारचें* ओज आहे, प्रसन्नता आहे, स्फूर्ति आहे भारतीय तत्त्वज्ञान, इतिहास, कला यावर त्यानी किती लिहिलें ? भारताचा आत्मा त्यानी दाखविला भारतीय कलावरील त्याचे लेख अनुपम आहेत त्यानी स्वत युरोपियन चित्रकला व शिल्पकला याचा मार्मिक अभ्यास केलेला होता स्वत युरोपातील उत्कृष्ट चित्रसंग्रहालयें व शिल्प-संग्रह पाहिले होते भारताचीहि यात्रा करून मंदिरें, लेणीं, गुंफा, मशिदी, किल्ले सर्व त्यानी सहृदयतेनें, भावभक्तीनें व मार्मिकतेनें पाहिलें होतें भारतीय इति-

हासाचा व कलाचा त्यांना किती अभिमान ! भगवान् बुद्ध, अशोक, अकबर, राणा प्रताप, शिवछत्रपति, चांदबिबी, अहल्याबाई वगैरे नावें आठवताच त्यांची समाधि लागे. एकदा त्या बुद्धगयेला गेल्या होत्या. येथे भगवान् बुद्धास ज्ञान झालें, हा विचार मनात येऊन त्यांच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहूं लागल्या तेथून जाताना तेथील एक दगड त्यांनी बरोबर नेला. तेथील अणुरेणु त्यांना पवित्र वाटत होता. तो दगड त्यांच्या टेबलावर असे त्या दिल्लीला गेल्या होत्या. तेथील प्रख्यात खुदाबक्ष ग्रंथालयात शहाजहानचें हस्ताक्षर आहे. शहाजहान, मुम्ताज व ताजमहाल या तीन वस्तूंबद्दल निवेदितादेवींस फार वाटे शहाजहानचें तें हस्ताक्षर पाहून त्यांचें हृदय उचंबळलें पत्नीची पवित्र स्मृति बाळगणारा, ताजमहाल बांधणारा शहाजहान त्यांच्या डोळ्यासमोर आला त्यांनी तेथील व्यवस्थापकास विचारलें, "मी या कागदाला क्षणभर हात लावूं का?" त्यांना परवानगी मिळाली. त्यांनी त्या हस्ताक्षराला हात लावला व डोळे मिटून उभ्या राहिल्या ताजमहालचें स्वप्न पाहणाऱ्या शहाजहानच्या काळात जणु त्यांचा आत्मा जाऊन आला

हिंदुस्थानातील अणुरेणूबद्दल, हिंदी वस्तूबद्दल, हिंदी इतिहासाबद्दल असें प्रेम कितीकांस आहे ? आपण स्वतःला भारतीय म्हणवतों, परंतु आपलें हृदय असें उचंबळतें का ? निवेदिता हिंदुमुसलमानांच्या केवळ मारामाऱ्यांचा इतिहास पाहणारी नव्हती. थोर राष्ट्रीयतेच्या दृष्टीने पाहणारी होती स्वामी विवेकानंद महंमदाच्या जन्मदिवशीं उपवास करीत असत, ज्याप्रमाणे बुद्धजयंती, कृष्णजयंतीसहि ते करीत अशा महापुरुषाच्या चरणाशीं बसून निवेदितेने राष्ट्रसेवेचे व राष्ट्रीयतेचे धडे घेतले होते

कलकत्त्यास 'मॉडर्न रिव्ह्यू' हें मासिक १९०७ मध्ये सुरु झालें कोणताहि नवीन उपक्रम असो, त्याला निवेदिता साहाय्य व्हावयाच्या या मासिकासाठी त्या नेहमीं लिहीत त्या लेखांचीं पुस्तकें झालीं आहेत ते सारे लेख केवळ स्फूर्तिमय आहेत हिंदुमुसलमान कशीं नवसंस्कृति निर्मित होते, भारताचा संदेश काय, नवीन प्रश्न कसे हातीं घेतले पाहिजेत, भारतीय कलांतील विशेष कोणता, एक का दोन — शेकडो विषयावर त्या लिहीत त्यांच्या लिहिण्यांत अभिजातता आढळून येते प्रतिभा दिसून येते. इतिहाससंशोधक राजवाड्यांजवळ जशी एक प्रकारची प्रतिभा होती तशी निवेदितादेवींजवळ होती

त्या पाश्चिमात्य देशांतीलही वर्तमानपत्रांस व मासिकांस लेख पाठवीत. लेख लिहूनच त्यांना स्वतःचा उदरनिर्वाह करावा लागे; परंतु एकदा एका युरोपियन संपादकाने " अशा अशा प्रकारचें लिहाल, तर इतके पैसे देऊं " असें सांगितलें. निवेदितेनें कळविलें, "मी लिहीन तसें हवें असेल तर कळवा. दुसऱ्यांच्या मतांप्रमाणे मी लिहीत नसतें." त्या पैशासाठी लिहीत नसत. त्यांच्या लिहिण्यांत त्यांचा आत्मा असे, त्याना सापडलेलें सत्य असे.

लेख लिहिणें व व्याख्यानें देणें हें त्यांचें काम असेच, परंतु कलकत्त्यास त्यांनी मुलींची शाळा काढली. प्रथम या पाश्चिमात्य बाईच्या संस्थेंत कोणी मुली पाठवीना. त्यांनी घरोघर जाऊन मुलींची भिक्षा मागावी. सायंकाळीं शाळेंतील मुली घरोघर नेऊन पोचवाव्या. त्यांची तपश्चर्या फलद्रूप होऊं लागली. शाळा भरभराटली. ही शाळा म्हणजे त्याचें जीवन. सर्व कांही शाळेसाठी. रात्रंदिवस शाळेचें चिंतन. जें काम हातीं घ्यावयाचें त्यांत सारा आत्मा ओतावयाचा, ही तर गीतेची शिकवण.

पै न् पै या शाळेसाठी खर्च होई. निवेदिता तपस्विनीप्रमाणे रहात. त्यांच्या खोलींत कांही नसण्याचें सौंदर्य होतें. त्या खोलींत फक्त एक चित्र होतें. तें त्यांच्या शाळेंतील एका मुलीनें काढलेलें होतें. आपल्या शाळेंतील विद्यार्थ्यानें काढलेल्या चित्रानें आपली खोली सजविणारे कितीसे शिक्षक असतील ? एकदा प्रख्यात कलाभ्यासी व कलाटीकाकार श्री कुमारस्वामी निवेदितादेवींस भेटावयास आले होते. कलेवर बोलणें झाल्यावर कुमारस्वामी खोलींतील तें चित्र पाहून म्हणाले, "सुंदर आहे हें चित्र." निवेदिता म्हणाल्या," आमच्या, शाळेंतील मुलीनें काढलें आहे तें." कुमारस्वामी निघून गेल्यावर निवेदितादेवी त्या मुलीच्या घरीं धावत गेल्या व म्हणाल्या, " पाहिलेस, कुमारस्वामींनीसुद्धा तुझें चित्र चांगलें ठरविलें. केवळ मीच नाही. चांगलेंच आहे तुझें चित्र." त्या मुलीला किती आनंद झाला असेल ? खरा शिक्षकच असें करूं शकतो.

एकदा निवेदितादेवी आपल्या खोलींत बसल्या होत्या. कलकत्त्यास उन्हाळ्यांत फारच उकडतें. जसें शिजल्यासारखें होतें. निवेदिता आपल्या खोलींत पुठ्ठयाच्या एका तुकड्याने वारा घेत होत्या. इतक्यात कोणीतरी मुलाखतीसाठी आलें. मुलाखतवाला म्हणाला, " एखादा पंखा का नाही घेत विकत !" ही थोर

सेविका म्हणाली, " पंखा कसा घेऊं ? तो आणा माझ्या शाळेसाठीं नको का ?" किती संस्थाचालकांस आपल्या संस्थेविषयी असें प्रेम असेल, तिच्यासाठीं असा त्याग करावा असें वाटत असेल ?

राष्ट्रीयत्वाचा अभिमान आपल्यापेक्षा निवेदितादेवींना सहस्रपटीने अधिक वाटे. आपल्या देशी बोलण्यात मधून इंग्रजी शब्द येतात. त्याना हे खपत नसे एके दिवशीं त्याच्या शाळेतील मुली आपसात बोलताना, " लाइन लाइन " हा शब्द वरचेवर उपयोगीत होत्या. निवेदिता जात होत्या. त्या थांबल्या व म्हणाल्या, " लाइन लाइन काय म्हणता ? त्याला बंगाली शब्द कोणता ? " मुलींना पटकन् सांगतां येईना. एकीने " रेखा " हा शब्द सुचविला निवेदितेस परमानंद झाला. त्या म्हणाल्या, " हां, बरोबर. लाइन म्हणजे रेखा. रेखा " असें म्हणून तो शब्द घोकीत त्या निघून गेल्या

त्यानी प्रौढ स्त्रियांसाठींहि वर्ग उघडले. बंगाली स्त्रियात पडदा आहे पडदानशीन स्त्रिया येणार कशा ? शेवटीं निवेदितादेवी एका घरीं जात. तेथे बाया जमत निवेदिता तेथे शिकवीत व मग बायका पुन्हा पडदानशीन होऊन आपापल्या घरीं जात काही दिवस या घराशेजारींच त्या स्वत. येऊन राहिल्या

अशा रीतीने स्त्रीशिक्षणास त्यानीं चालना दिली लेखानी, भाषणांनी राष्ट्रीयत्वास व राष्ट्रीय संस्कृतीच्या विविध अंगास चालना दिली भारतीय कला व इतिहास याचा कसा अभ्यास करावा तें शिकविलें भारतीय कलातून व संस्कृतीतून सर्वत्र प्रतीकवाद कसा आहे तें दाखवले हें सारें करीत असता, रस्ते झाडणें, आजाऱ्याची शुश्रुषा करणें वगैरे कामें चालूच असत बंगालमध्ये नेहमी पूर येतात गावेच्या गावे वाहून जातात मग दुष्काळ, रोग फैलावतात अशा प्रसगीं निवेदिता आधी धावून जात एकदा असाच पूर आला होता रोगराई फैलावली होती. त्या पावसात, त्या दलदलींत त्या गेल्या. सेवेस त्यानी वाहून घेतलें, परंतु त्या अपार श्रमाने त्याच आजारी पडल्या. त्याना हिवताप जडला. तो थांबेना त्या काही दिवस अमेरिकेंत जाऊन आल्या, परंतु हिंदुस्थानात आल्यावर पुन्हा आजारी पडल्या त्या काम करीतच राहिल्या " पुन्हा परदेशात जाऊन या, " असें कोणी म्हटलें तर त्या म्हणत, " गरिबांने कोठें जायचें

पुन्हा पुन्हा ! "

प्रकृति फारच बिघडली शेवटीं फारच आग्रह झाला, तेव्हा त्या दार्जिलिंग येथे गेल्या स्वच्छ बर्फाच्छादित हिमालयाचीं शिखरें पाहून त्या दुःख विसरत, परतु आजार कमी होईना मृत्यु जवळ आला तो दिवस उजाडला उष काल होत होता निवेदितादेवी म्हणाल्या, " तो पहा उष काल, तो पहा प्रकाश ! तो भारताचा उष कालहि बघा, ती पहा नवभारताची प्रभा ! भारताची नाव तीराला लागेल ! " हेच शेवटचे शब्द भाग्याचा उष काल बघत त्या देवाजवळ गेल्या त्याची नाव तीराला पोचली भारताची कधी वरें पोचेल ?

१९१२ मध्ये त्या देवाकडे गेल्या जळजळीत, तेजोमय, सेवामय, प्रतिभासपन्न जीवन ! आपलें समृद्ध जीवन भारतासाठी त्यानी दिलें रसमय, परमपवित्र असें जीवितपुष्प भारतमातेच्या चरणीं वाहिलें निवेदितादेवींचें चरित्र डोळ्यासमोर येऊन मला लाज वाटते व त्यांच्या चरित्रातील तळमळ सहस्रांशानें माझ्यात येवो, असें सदैव वाटत असतें

निवेदितादेवींच्या काही सस्कृत व सुदर विचारानीं भरलेल्या पुस्तकाचीं मी १९३२–३३ मध्ये नाशिकच्या तुरुगात भाषातरें केलीं होतीं तीं प्रसिद्ध झालीं नाहीत त्या भाषातरापैकी कलेवरील निबधाचें भाषांतर आज प्रसिद्ध होत आहे भारतीय चित्रकला व शिल्पकला यावरील निवेदितादेवींचे विचार उद्बोधक वाटतील व नवदृष्टि देतील, अशी मला आशा आहे



निबंध पहिला :

# राष्ट्रीय भावना निर्माण करण्यांत कलेची कामगिरी

• हिंदुस्थानांतील राष्ट्रीय भावना कोणतें स्वरूप घेऊं पहात आहे ? कोणता आधार घेऊं पहात आहे ? स्वतःचीं कर्तव्यें, स्वतःचीं ध्येयें, स्वतःची आध्यात्मिकता पुन्हा एकदा आपलीशी करण्याचा हा प्रयत्न आहे. सर्वच दिशानी आज पुनर्रचना, पुनर्घटना करावयाची आहे. हें सर्व करीत असतानाच आपण राष्ट्र या पदवीस पोचूं. आपण आता राष्ट्र बनूं लागलों आहोंत. आरंभ झाला आहे कोणतीहि पुनर्घटना, कोणताहि फरक विध्वंसक स्वरूपाचाच असतो असें नाही फक्त जुनीची पुनर्घटना, हेतुशून्य फरक हा मात्र मारक होत असतो. राष्ट्रीयतेचें ध्येय नैतिक व आध्यात्मिक स्थिरता देण्यासाठी आलें आहे. हें ध्येय आपणांस मुक्त करण्यासाठी आलें आहे. आज ह्या राष्ट्रांतील कोणत्याही क्षेत्रांतील धडपड पहा. त्या धडपडींत आपण राष्ट्र व्हावें, ही भावना प्रामुख्याने दिसून येते. राष्ट्रीयतेचाच विचार स्पष्टपणें या धडपडींतून दिसतो. भारतातील धडपडणाऱ्या मुशाफरांच्या समोर राष्ट्रीयतेचा ध्रुवतारा आज सारखा चमकत आहे.

उदाहरणार्थ, आपण स्त्रीजातीची सुधारणा, स्त्रियांची स्थिति याचा विचार करूं या. स्त्रियांची जी संस्कृति आहे तिच्याकडे वळूं या. स्त्रियांच्या संस्कृतीतहि नवीन दिशा आणावयास हवी का ? या बाबतींतहि मोडतोड करायला पाहिजे का ? यादि गोष्टींत फरक करण्याची, बदल करण्याची जरूर आहे का ? जर

पाहिजे असेल तर कोणत्या बाबतींत ? कोणती दिशा ? आपण आज सारे धावपळ करीत आहोंत, निराश होत आहोंत, नाशाकडे जणु जात आहोंत या गोष्टीपसून आपण आपला आधी बचाव करून घेतला पाहिजे, आणि मग निश्चयाने व दढरीतीने नीट सुसंघटित झालें पाहिजे, एकजीव झालें पाहिजे. आपण स्वावलंबी, स्वाश्रयी, स्वत चें ध्येय समजलेले, स्वत च स्वत ला प्रेरणा देणारे असें झालें पाहिजे- थोडक्यात राष्ट्रीय वृत्तीचे होण्याचा आपण दृढ निश्चय केला पाहिजे. हा दृढ निश्चय झाला म्हणजे मग कोणत्या दिशेने प्रगति करीत जावयाचें, तें आपो-आप दिसूं लागेल. फरक तर केलाच पाहिजे सारें जगत् बदलत आहे, पुढे जात आहे सान्या जगातील राष्ट्रांच्या घडामोडी होत आहेत मग भारतहि नवे नवे आकार, नवे नवे रूप धारण करणार नाही का ? कात टाकलेल्या सर्पाप्रमाणे पुन्हा सतेज होणार नाही का ? परंतु जे काही फरक करावयाचे ते नीट विचार-पूर्वक करावयाला हवेत आपण स्वत न्या इच्छेने, स्वत च्या मताने करायला हवेत उगीच कोणाचें अंध अनुकरण करावयाचें नाही आपण कोणाचे.गुलाम होऊन नाचावयाचें नाही स्वतत्रपणें आपण आपल्या माड्या बाधूं, घरें बाधू आज शेकडो वर्षे शतकानुशतकें आपल्या नारी जातीसमोर सीतासावित्री याचे आदर्श आहेत, जिजाई, अहिल्याबाई याचे आदर्श आहेत. हे आदर्श सोडून आज आपल्या भगिनी काडीमोड करणाऱ्या होणार काय ? त्याना फुलपाखरें बनवायचीं काय? हिंदुस्थानातील पद्मिनी जाऊन तिन्या जागी ग्रीक हेलन येणार काय? फरक तर करायला हवाच आहे; फेरबदल केला नाही, तर हिंदुस्थानचा उज्ज्वल भूतकाल बुडून जाणार यात शंका नाही. भूतकालीन सस्कृति टिकवण्यासाठीच फेरफार करावयाचा आहे फरक तर केलाच पाहिजे- त्याशिवाय तरणोपाय नाही, परतु प्राचीन, भूतकालीन गभीरता, पूज्यता, शहाणपणा हीं ठेवून त्यात नवीन ज्ञानाची भर घालं या प्राचीन पवित्रता काही झालें तरी गमावता कामा नये जें आधीच विशुद्ध आहे, निर्मळ आहे, त्याच्यावर जर आणखी जबाबदाऱ्या टाकल्या, त्याचें कार्यक्षेत्र जर विशाल केलें, तर ते अधिकच निर्मळ होईल गभीर ज्ञान आणखी गभीरतर करू- व या ज्ञानातून नवीन उदात्त कोमलता निर्माण होईल भावी भारतातील माताचे ध्येय भारतमाता-ही थोर माता ठरवीत आहेत, ती स्वत च्या हाताने तें घडवीत आहे, अशी आपण हृदयात श्रद्धा व आशा बाळगू या भावी

भारतातील मातांचें हें ध्येय अभिनव, सुंदर व रमणीय होईल ते इतकें मनोहर व उदात्त होईल की, प्राचीन काळातील ध्येयस्वप्नांचा मेणबत्ती– नवीन उदयोन्मुख अर्वाचीन साक्षात्काराच्या उषःकालासमोर फिकी पडेल, असुरू वाटतं

आपणासमोर अनेक प्रश्न आहेत त्यातील स्त्रीशिक्षण हा एक झाला, परंतु सर्वच बाबतींत आपणास नवीन प्रकाश निर्माण करावयाचा आहे, नवीन दिशा घ्यावयाची आहे, नवीन मार्ग पत्करावयाचा आहे शिक्षण, शास्त्र, व्यापार, उद्योगधंदे– सर्वत्र नवीन सर्चलाईट पाडावयाचा आहे सामाजिक बाबतींत कोणत्या सुधारणा आधी हव्यात, कोणत्या करणें योग्य, कोणत्या करणें अयोग्य, या बाबतींत आपण कितीतरी वेळ वाध्याकूट केला व कालापव्यय केला, परंतु या बाबतींत चर्चा करण्याइतकी पात्रताच आपल्यामध्ये नव्हती, ही त्यातील खरी गोष्ट आपणास नीट ज्ञान नव्हतें, जबाबदारी नीट आपण ओळखीत नव्हतों व आपणास विचार करण्यास अवसर नव्हता परकीयांची टीका व सत्ता यानाच गुरू मानून आपण काहीतरी बोलू लागलों, वाहून जाऊ लागलों सुधारणा करण्यासाठी आवश्यक असणारें ज्ञान जगात फार दुर्मिळ असतें, तें मिळवणें फार दुस्तर असतें, परंतु कोणत्या बाबतींत कसेकसे फरक घडवून आणावयाचे, या महत्त्वाच्या बाबतींत निश्चित दिशा ठरवण्यासाठी ज्ञान, जबाबदारीची जाणीव व नीट मनन या गोष्टीची जरूर आहे राष्ट्रीयतेची भावना हृदयात वाढूं लागताच आपणास जणु मग दुसरे विचारडोळे येतात, नवीनच एखादें बुद्धींद्रिय फुटतें, आपणास नवीन चित्स्फूर्ति येते परस्परातील संबंध व ऐक्य दिसून येऊ लागतें वृक्षाच्या फांद्या, पानें, फुलें, फळें, मुळें यांचा नीट संबंध समजून येऊ लागतो. ही दृष्टि आली म्हणजे मग आपणाला राष्ट्राच्या भवितव्यतेची चर्चा करण्याचा अधिकार मिळतो

आपणास भारतीय कलांच्या बाबतींत तर इतर क्षेत्रांच्या आधी गेलें पाहिजे कला राष्ट्राचें जीवन बनवीत असतात जें कलांचें ध्येय, ते राष्ट्राचें ध्येय होय कलांमध्ये प्राण ओतला म्हणजे राष्ट्रामध्ये प्राण संचरेल राष्ट्रांतील बुद्धिमान् लोक एकत्र येऊन भारताच्या भूत व भविष्य कलेबद्दल विचारविनिमय करीत आहेत, असी आपण कल्पना करू या या बुद्धिमान् लोकांनी काय शोधावयाचें ? त्यांनी कशाचा निर्णय करावयाचा ?

हिंदु धर्माचा एक विशेष हा आहे की, हिंदु धर्म म्हणजे प्रतीकशाळा आहे. प्रत्येक कल्पनांचीं, विचारांची प्रतीकें आहेत. म्हणजेच हिंदुधर्म मूर्तिपूजक आहे. अडाणी शेतकरी, बाजारांत बसणारा– हिंडणारा अत्यंत दरिद्री मनुष्य, यांनाही चित्र आवडतें, प्रिय वाटतें, त्यांना तें समजतें. एखादें सुंदर भांडें, एखादा पुतळा, एखादें नक्शी काम पाहून त्यांना आनंद वाटतो. हिंदुस्थानांतील नयन-संस्कृति पूर्ण विकसित झालेली आहे. इटलीबद्दल असेंच म्हणतात. सौंदर्य पहावयास डोळे दिलेले आहेत. हिंदुस्थानांतील प्राचीन मूर्तिपूजेने डोळ्यांपासून हृदयाला जाऊन मिळावयास अत्यंत जवळचा रस्ता शोधून काढला आहे. सरळ व समीपवर्ती रस्ता; या रस्त्याने अनेक गेले, अनेक जात आहेत. या मूर्तिपूजेचें महत्त्व विश्वव्यापक आहे; तिची हाक सर्व हृदयांना ऐकूं जाते. चित्र नेहमी आपली भाषा बोलतें, आपली कथा सांगतें, न चुकतां सांगतें व ती भाषा सर्वांना समजते. तुमची बोलण्याची भाषा कोणतीही असो. तुम्ही सुशिक्षित असा वा नसा, चित्र तुमच्या हृदयाजवळ बोलेल. आपलें घर नेमकें सापडावें म्हणून उंबऱ्यांत दिवा लावून ठेवून नदीवर गेलेली गृहिणी, तुळशीजवळ लावून ठेवलेला दिवा, सायंकाळीं सूर्यदेव मावळला म्हणजे गायीचें घरीं गोठ्यांत येणें, अशा प्रकारचे देखावे जर रंगवले गेले, चितारले गेले, तर सर्व भारतीयांच्या हृदयांना एकच संदेश दिला जाईल; कला म्हणजे सर्वांना समजणारी भाषा, सर्वांची भाषा; राष्ट्राची पुनर्रचना करतांना, राष्ट्राचें मंदीर, मातृ-मंदिर पुन्हा उभारतांना या सर्वसामान्य भाषेचें फार महत्त्व आहे. या कलेचेंही पुनर्जीवन झालें पाहिजे. पुनर्जीवन म्हणण्यापेक्षा, पुनर्जन्म म्हणण्यापेक्षा, पुनर्जागृति म्हणणें युक्त होईल; कारण हिंदुस्थानांत कलाविकासाचीं महान् युगें अनेकदा येऊन गेलीं व तीं मेलीं असें म्हणतां येणार नाही. ज्या काळांत हत्ती खोदले गेले, त्या काळांत हिंदुधर्माची संघटना होत होती. सर्व पृथक्करणांतून एकता निर्माण होत होती. अर्वाचीन यथार्थवादी चित्रकलेइतकेच अजिंठ्याच्या सुंदर चित्रकलेंत माधुर्य व कौशल्य आहे. कला स्वतंत्र होती, जिवंत होती, सृष्टीचें बारीक बारीक नाजुक रूप दर्शवणें, सृष्टीतील अनंत कोमल छटा दर्शवणें, वगैरे गोष्टी त्या कलेला उत्कृष्ट साधल्या होत्या. सांची, अमरावती, गांधार येथे शिल्पकलेची आणखी उत्क्रांति होत गेली. मधूनमधून पुन्हा कलेला उत्साह पूर येत होते. मुसलमानी अमदानीतही स्वतंत्र कलेचा

विकास व विलास चाललाच होता. कलेचा आकार बदलला, बाह्यरूप बदललें, परंतु अंतरात्मा बदलला नाही. भारतांतील कला अनुकरण करणारी झाली नव्हती; ती स्वतःची सृष्टि निर्माण करणारी होती. मुसलमानी काळांत शिल्पकलेला नवीन वळण मिळालें. कलेचा आत्मा नवीन शिल्पकलेंत प्रकट होऊं लागला.

या सर्व काळांतील विशिष्ट शक्ति व प्रतिमा ही आज आपण आपलीशी करून घेतली पाहिजेत. हें राष्ट्रीय युग आहे. प्राचीन काळांतील सर्व उत्कृष्ट तें घेऊन पुढे जावयाचें अशी ही वेळ आहे. भूतकाळाशीं नीट संबंध जोडून घेणें यांतच नवीन विजयाची किल्ली आहे. ज्याला भूतकाळ नाही, त्याला भविष्य नाही. जेथे पाया नाही तेथे कळस नाही; मूळ नाही तेथे शेंडा नाही; भांडवलाशिवाय व्यापार कसा करणार ? अर्वाचीन विद्यार्थ्याने ही गोष्ट ध्यानात धरेली पाहिजे– भूल करून चालणार नाही. एकाएकी विशाल, विराट् संसार पाहण्याचा कठिण, परंतु भव्य, दिव्य प्रसंग त्याच्यावर आला आहे. या दिव्यातून यशस्वीपणें त्याला पार पडावयाचें आहे. आपल्या लोकांनीच निर्माण केलेल्या गोष्टींतील कल्पनाशक्तीने त्याची दृष्टि, त्याची शक्ति आज बांधली गेलेली नाही. तो स्वतंत्र आहे. पूर्वजांप्रमाणे स्वजननिर्मितिबद्ध नाही. ईजिप्तच्या कलेची ग्रीक कलेशीं तो आज तुलना करूं शकेल. मध्ययुगीन इटालियन व डच कलेची अर्वाचीन फ्रेंच कलेशीं तुलना करूं शकेल. आजूबाजूची विशाल सृष्टि पाहून त्यांतील आपलें स्थान तो ओळखील व त्याची सृष्टि जास्त विशाल, स्वतंत्र व मुक्त होईल. स्वतःचें स्थान जर त्याला माहीत नसेल तर मात्र नुकसान होईल. कुंपणाशिवाय न वाढणाऱ्या लहान रोपाच्या भोंवतालचें कुंपण काढून घेण्याप्रमाणें तें होईल.

भारताने केवळ प्राचीन कलेच्याच हाका ऐकावयाच्या, असें नाही; कलेमध्ये नाविन्य आणावयाचेंच नाही असें नाही; आपणांस बहिष्कार घालावयाचा नाही. परंतु भारताला कलेची परंपरा आहे; या परंपरेच्या शाळेंत भारतीय मन शिकलें आहे. भारतीय संस्कृतीत ही कला रंगलेली आहे; या कलेभोवती भारतीय वातावरण उभारलेलें आहे; इटली अथवा ग्रीस देशातील कलेच्या भाषेंत इथल्या लोकांजवळ बोलणे चुकीचें होईल भारतीय चित्रकला, जर ती अभिजात भारतीय रहावयाची असेल, तरी भारतीय रहावयाची असेल व जर तिला थोर

पदवीस जावयाचें असेल, श्रेष्ठ स्थान मिळवावयाचें असेल, तर त्या कलेने भारतीय हृदयें हलवलीं पाहिजेत; भारतीय रीतीने भारतीय मनाजवळ बोललें पाहिजे; जो विचार, जी भावना भारतीय मनाला परिचित असेल किंवा सहजगम्य असेल तीच चितारली पाहिजे, तीच चित्रद्वारा प्रकट केली पाहिजे; एवढेंच नव्हे तर त्या कलेला परमोच्च स्थान द्यावयाचें असेल तर तिने पाहणाऱ्याच्या मनांत अशी भावना उत्पन्न केली पाहिजे, असें कांही तरी दिव्यदर्शन त्याला घडवलें पाहिजे की, तें चित्र पाहून पाहणारा उन्नत होईल, त्याचें हृदय थोर होईल; परंतु हें सारें कला राष्ट्रीय असल्याशिवाय होणार नाही; राष्ट्राच्या, आपल्या बांधवांच्या ज्या अभिरुची हजारो वर्षांनी बनलेल्या आहेत, ज्या भावना त्यांच्या रोमरोमांत भिनलेल्या आहेत, त्यांचें सहाय्य घेऊनच कलेला हें अपूर्व ध्येय गाठतां येईल.

जो भारतीय शिल्पकार ओरिसातील कोरलेले दगडी दरवाजे नीट अभ्यासील, जो दक्षिण हिंदुस्थानांतील गोपुरांचे, प्रचंड मंदिराचे ते चांदीचे दरवाजे अभ्यासील, त्याच्या सौंदर्यशास्त्राची अशी महान् भाषा मिळाली असें म्हणतां येईल. त्या भाषेंत जेव्हा तो बोलेल, त्या वेळेस सर्व भारतास ती भाषा समजेल व भारताच्या बाहेर भारतीय शिल्पकलेचा अभ्यास केलेले जे असतील त्यांच्या-जवळही ती भाषा बोलेल. या भाषेंतच त्याला निर्दोष व अव्यंग रीतीने पूर्णतेने बोलतां येणें शक्य आहे; कारण ही भाषा त्याला स्वतःला पूर्ण माहीत आहे. या भाषेंतील प्रत्येक रेषा, प्रत्येक बाक, प्रत्येक वळण, त्याला माहीत आहे; परंतु युरोपमधील मध्ययुगांतील गॉथिक धर्तीची खिडकी खोदतां येईल का? ओरिसांतील दरवाजा तो खोदील, परंतु गॉथिक वातायन त्याला दाखवतां येणार नाही, निर्माण करतां येणार नाही. तो स्वभूमींतील उत्कृष्ट शिल्पकार आहे, नीट अभ्यास केलेला विद्यार्थी आहे; परंतु परकीयांच्या पद्धतीचा पुरस्कार करतांना तो चुका करील. कधींकधी तर पाश्चिमात्य कलेचें अनुकरण करूं जातां तिचें तो पतन करील; ती कला हास्यास्पद करील; ज्यांनी गॉथिक शिल्पकलेचा अभ्यास केलेला आहे, त्या वातावरणांत जे मुरलेले आहेत, त्यांच्या दृष्टीने भारतीय शिल्पकाराने निर्माण केलेला गॉथिक नमुना हास्यास्पद ठरेल! परकी कलेचें अनुकरण करणारा नरी परकी कला दाखवूं शकत नाही. भारतीय शिल्पकार

पूर्वी नसलेली गॉथिक कला दाखवील, ज्याप्रमाणे इंग्लिश किंवा जर्मन अनुकरण करणारे भारतीय मनांतील पूर्वी नसलेला असा नमुना दाखवतील. अन्योन्य म्हणतील की, " असा गॉथिक नमुना पुढे होईल–परंतु मागे नव्हता; " " हा भारतीय नमुना नाही, हें दुसरेंच काही आहे. " चित्राचीसुद्धा याप्रमाणे भाषा असते. चित्रकलेंतही शब्द आहेत. अनंत शब्दांचे, त्या त्या देशातील शब्दांचें चित्र हें काव्य असतें. ज्याप्रमाणे खरा हाडाचा कवि आपखुषीने आपलीं काव्यें परकी भाषेंत लिहिणार नाही, त्याप्रमाणे खरा कलावान् अमर असे आपले कलेचे नमुने परकीय तन्हेचे करणार नाही, तर लोकाना समजणाऱ्या भाषेंतच, त्यांना समजल्या जाणाऱ्या चिन्हांनीच ते निर्माण करील; कारण खरें काव्य, खरें चित्र, खरें शिल्पकाम–सर्व महान् उद्गार– हा हृदयांतून बाहेर आलेला असतो; ती हृदयाची हाक असते; पिळवटून आलेला तो हृदयोद्गार हृदयाला भिडूं जाऊं पहात असतो; समान हृदयाची सहानुभूति अपेक्षित असतो. हाका मारणारे लोक, हृदय पिळवटून आरडणारे लोक परकी भाषेंत हाक मारीत नाहीत. पोटातिडीक मायभाषेंतच बोलते.

आपल्या कलेची पद्धत स्वराष्ट्रविशिष्ट आहे, स्थानविशिष्ट आहे, एवढ्याने ती सकल मानवाच्या हृदयाला जाऊन भेटणार नाही असें नाही. उलट खरी कला कोणत्याही पद्धतीची असो, ती ज्याला ज्याला हृदय आहे, त्याला त्याला गहिंवरवील, त्याला तन्मय करील. ओरिसांतील दरवाजाची ढब परकीयाला समजणार नाही, तरी ती पाहून त्यालाहि आनंद होईल. जें खरें सुंदर आहे, तें सर्वांना समजतें. तारे सर्वांना आवडतात व दवबिंदु सर्वांना सुंदर दिसतात! फुलें व मुलें यांचीं गाणीं सर्वांनी गायिलीं! तृणें व पाखरें कोणाला आवडलीं नाहीत? झरे, नद्या, सागर यानी कोणाचें हृदय भरून आलें नाही? त्यांचें संगीत कोणी ऐकलें नाही? उषा व निशा यांचें प्रशांत सौंदर्य कोणाला मुग्ध करीत नाही? खऱ्या सौंदर्याला कोठे प्रतिबंध नाही. पुराण ईजिप्तमधील मंदिरें–त्यांचे अनुकरण आपणास करता येणार नाही, तरीहि जर आपण त्यातील एखादें पाहिलें, तर आपण त्याचें कौतुक करूं. तें मंदीर तेथील वातावरणात नीट पद्धतशीर अशा प्रमाणबद्धतेने उत्पन्न झालें. त्या देशांतील पद्धतीचें तें प्रतिबिंब आहे, प्रतिनिधिरूप आहे त्या मंदिराचे विशेष आपणांजवळ बोलतात, ज्या गोष्टी सर्व हृदयात

आहेत, त्या गोष्टी तें मंदिर आपणाजवळ बोलते त्या ईजिप्शियन मंदिरासारखें मंदिर जर कोणाला करावयाचें असेल, तर ज्या लोकांनी तें मंदिर बांधलें, त्या लोकांतीलच जणु एक त्याने झालें पाहिजे, त्याने स्वत्व विसरून इजिप्शियन झालें पाहिजे, त्याच्या आशा, त्याच्या भावना, त्याचीं ध्येयें, विचार, जीवनसरणी, त्याचा धर्म, त्याची श्रद्धा, त्याची प्रार्थना–सर्वस्वी तद्रूप असें त्याने झाले पाहिजे असें असल्यामुळे त्या काळात त्या मंदिराचें जितकें कौतुक केलें जात असेल, त्या कालात तें जसें बोलत असेल व त्याचें बोलणें समजलें जात असेल, तसें आज ईजिप्तमधील लोकांजवळही तें मंदिर बोलणार नाही, मग बाहेरच्याची तर गोष्टच सोडा आपणास त्या प्राचीन काळात स्वत ला संपूर्णपणें घालता येत नाही, यामुळे त्या मंदिराचें सम्यक् ज्ञान आपणास होत नाही व सम्यक् ज्ञान नाही, म्हणून सम्यक् आनंदही नाही, कारण, कितीहि भावनोत्कटतेच्या उकळ्या आपण दाखवल्या व दांभिक असा क्षणिक गहिवर दाखवला, तरी अवशेष, पडकी इमारत, ओसाड पुरातन भाग गजबजलेल्या इमारतींपेक्षा केव्हाही अधिक सुंदर वाटणार नाही, असणार नाही जीवनातील रोजच्या परिचयाने प्रेम निर्माण होत असतें, वस्तु प्रिय होत असते

चित्रामध्ये, कलेमध्ये दोन भाग असतात ज्याप्रमाणे क्षणभंगुर शरीरात अमर आत्मा असतो, त्याप्रमाणे स्थानिक, तत्तत्कालीन, तत्तलोकीन कलेच्या नमुन्यात कालातीत व स्थलातीत असेंही काही असतें–मर्यादित देहात अमर्याद मन, त्याप्रमाणे त्या मर्यादित कलेच्या नमुन्यातही विश्वव्यापक, सर्वहृदयस्पर्शी असें काहीतरी असतेंच असतें, व तें विजयी होतें, तें जगाला डोलवतें पाश्चिमात्य कलेतील प्रसिद्ध मॅडोना व तिचें मूल हें मायलेकराचें सुप्रसिद्ध चित्र उदाहरण म्हणून घेऊं चितपुर–रोडमध्ये गेलें म्हणजे या चित्राच्या प्रती दिसतात–व तिकडे लक्ष्य गेल्याशिवाय रहात नाही हें चित्र का बरें सर्वांची दृष्टि ओढून घेतें? कारण या चित्रात सर्वांना परिचित, अत्यंत जिव्हाळ्याचे असे भाव आहेत या चित्रातील हेतु जीवमानाला मुग्ध करणारा आहे तें चित्र अडाण्यालाही आवडलें, तोही तें प्रेमाने हृदयाशीं धरतो त्या चित्रातील त्या दोन व्यक्तींचीं जीवनें भारतीय गिऱ्हाइकास माहीत नसतील, त्यांचीं नावें माहीत नसतील, नावें माहीत असलीं तरी इतर काही माहीत नसेल. त्याला तें दिव्य बाल्य–जन्म–काव्य माहीत

नसेल; त्या दिव्य पुत्रजन्माच्या कथा माहीत नसतील; परंतु कांहीही असो, त्या चित्रांत आई आहे व तिचें बाळ आहे. बस्स. साऱ्या जगाला समजतें तें चित्र. मायलेकरांचें प्रेम सर्वत्र दिसून येत आहे. आई लेकराला पाजीत आहे, त्याला वात्सल्यानें पहात आहे, हें दृश्य कोणाला माहीत नाहीं, कोणी पाहिलें नाहीं? कलेमध्यें हें जें सरलहृदयस्पर्शी असतें, तें स्थानमर्यादा, कालमर्यादा दूर करतें–व सर्वांना जवळ आणतें–तो कलेचा नमुना सर्वांचा होतो. परंतु आपण अशी कल्पना करूं या की, भारतीय चित्रकारानें असेंच अनुपम अत्युत्कृष्ट भारतांतील मायलेकरांचें, बाळबाळंतिणीचें जर चित्र काढलें, साधें, अर्थपूर्ण, गंभीरता व कोमलता, मंगलता, दिव्यता यांच्या भावना मिसळलेलें असें काढलें तर मग हें चित्र भारतीयाला जास्त प्रिय वाटेल की वरचें पाश्चिमात्य मायलेकरांचें?

जयपूरच्या म्यूझियमच्या भिंतीवरील चित्रें कोणीहि चितारलेलीं असोत; या चितान्यास प्राचीन भारतीय चित्रकलेचा आत्मा भेटलेला होता, त्याला प्राचीन भारतीय चित्रकलेंतील महत्त्व व श्रेष्ठत्व कशांत आहे, हें कळलेलें होतें. या प्राचीन कलेचा भविष्यकाळ कमा उज्ज्वल व महनीय होईल, याची दिशाही जणु त्याला दिसली होती. एका जुन्या चित्रयुक्त महाभारताच्या प्राचीन हस्तलिखितांतील चित्राचें वाढवून काढलेलें एक चित्र तेथील भिंतीवर आहे. मुळांतील तें चित्र शंभरपटींनें मोठें करून काढलें आहे. युधिष्ठिराचें द्यूत खेळण्याचें तें चित्र आहे. नारिंगी व सोनेरी रंगांची झळक त्यांत आहे; नाना आकृति, नाना मूर्ति, नाना हावभाव, नाना विकार–विचार त्यांच्या मुखांवर आहेत तें चित्र जणु जिवंत वाटतें. कोणाचें तोंड पुढें होत आहे, कोणाचे हात– प्रत्येक जण जणु कांहीं तरी करीत आहे; अद्‌भुत सौंदर्यपूर्ण हें चित्र आहे. कोणाही अर्वाचीन चित्रकाराला, इतक्या सहज न कळत अशी हृदयप्रकटता साधली नसती, असें हृदयदर्शन-भावदर्शन करतां आलें नसतें. इतक्या लहानशा जागेंत इतकें जीवन, इतके नमुने तेथें दाखविले गेले आहेत की, असें कौशल्य– अशा लहान जागीं अपार सृष्टि दाखवणारा, बिंदूंत सिंधू ओतणारा, मुखांत विश्वरूप दाखवणारा–असा कुशल चित्रकार अर्वाचीन काळांत झाला नाहीं. भारतीय चित्रकलेचे हे महनीय व उदात्त विशेष– ही भावप्रकटता–थोडेसें अल्प मिळवण्याच्या नादीं लागून आपण गमावून बसूं नये. कणभर मिळवूं पण मणभर गमावूं व मग उपाशी मरूं!

परतु जी गोष्ट महान् आहे, विशाल आहे, व्यापक आहे, ती दुसऱ्या वस्तूना मिळवून घेऊनहि स्वस्वरूप गमावीत नाही सागर नद्याना पोटात घेतो– परतु यामुळे तो क्षुद्र होत नाही खरी थोर कला नवीन ज्ञानलब्धीने भ्रष्ट होत नाही त नवीन ज्ञानही ती आत्मसात् करते या धूतदृश्याचें चित्र चितारणाऱ्याला जर थोडें शास्त्र माहीत असतें, वस्तु दूर असली, म्हणजे कशी हळूहळू अदृश्य होत जाते– दृष्टीची मध्यता कशी पहावी–हें त्याला समजतें– तर आणखीच सुदर हें चित्र झालें असतें या ज्ञानाचा परिणाम त्याच्या त्या चित्रावर झाला असता परतु यामुळे त्याने आपली रगविशुद्धता, रगसौंदर्य हीं काही गमावलीं नसतीं, किंवा वैभवता, विशालता, विपुलता व सपन्नता याची त्याची आवड, तीहि त्याने गमावली नसती, जणु स्फूर्तीने एखाद्याचा चेहरा दाखवणें, एखाद्याच्या मनाचा भाव स्पष्ट प्रगट करणें, किंवा चित्र अलकृत करण्याची त्याची शक्ति–या त्याने गमावल्या नसत्या कलेमध्ये राष्ट्रीय रीत म्हणून काहीतरी आहे युरोपातील कलेमध्ये जं शास्त्रीय ज्ञान असतें, त फक्त भारतीय कलेनें मिळवून घ्यावें म्हणजे झालें अशी कल्पना करून घ्यायला नको की यथार्थता, बिनचूक यथार्थता ही केवळ पाश्चिमात्य कलेंतच असते कलकत्त्याच्या चित्रकलामदिरासाठी सतराव्या अठराव्या शतकातील रामाच्या राज्याभिषेकाचें एक चित्र विकत घेण्यांत आलें या लहानशा सुदर चित्रात सिंहासनाच्या पाठीमागे, अयोध्येचा प्रासाद दाखवला आहे व त्या प्रासादाच्या मागे नदी, नदीमधाल नावा, शेतें, सैन्य वगैरे सर्व दाखवलें आहे 'लखनी–रीति' या चित्रात आहे या चित्रातील यथार्थदर्शन, प्रमाणबद्धता, छाया व प्रकाश, निदोष आहे सारें भिन्न रगछटाची एकता, उत्कृष्ट योजना व कल्पना, या बाबतींत तें उत्कृष्ट चित्राच्या बरोबर माडावयास काही हरकत नाहीं अयोध्येतील राजवाड्याचें चित्र काढणारा हा अज्ञात महान चित्रकार, त्याने या चित्रात काय दाखविलें नाही? बारीकसारीक सारी सृष्टि दाखवली आहे असें चित्र मध्यकालीन कुच चित्रकलासग्रहातही नाही राजवाडा स्वच्छ धवल सगमरवरी दाखवला आहे तो मोकळा आहे समोर आकाश पसरलेलें आहे! बृहद्दर्शक भिंगातून या चित्राकडे जर आपण पाहू, तर आपणास चरणाऱ्या गायी दिसतील, तबेल्यात जिन वगैरे घालून तयार राखलेले घोडे दिसतील, उट आणि हत्ती आणि निशाण सारें यथास्थित रेखाटलें आहे आणि लाब विस्तृत राजागणें आणि

दिवाणखाने–क्षितिजाकडे मिळावयास जाणारे–जणु स्वप्नांतील स्वर्गपुरीच आपण पहात आहोंत, असें वाटतें.

जर भारतीय चित्रकला अशा शिगेला पोचलेली आहे, तिचा असा विकास झालेला आहे, तिच्यामध्ये जर असे महत्तम विशेष आहेत, तर मग पाश्चिमात्य चित्रकलेने भारतीय विद्यार्थी इतका का वेडावून जातो, मोहून जातो ? कोणते असे पाश्चिमात्य कलेचे गुण आहेत ? स्वतःचा मार्ग सोडून दुसऱ्या खटाटोपींत हा भारतीय छात्र का जात आहे ? परकीय कलेंत तो का ढवळाढवळ करूं इच्छितो, तिचें अनुकरण करूं पाहतो ! पाश्चिमात्य कलेची त्यांना कल्पनाही नीट येत नाही व कल्पनाच नीट नाही, तर ती वठवतां तरी कशी येणार ? भारतीय चित्रकला आज ना भारतीय ना पाश्चिमात्य ! ती कलाच नाही; ती विकला होत आहे !

पाश्चिमात्य चित्रांत यथार्थदर्शन असतें, सृष्टीशीं जास्त सत्यरूप अशी ही कला आहे, म्हणून ती अति सुंदर व आकर्षक वाटते, असें भारतीय कलाभ्यासी म्हणेल पाश्चिमात्य कलेची ही फारच तारीफ झाली, जास्त स्तुति झाली. जो पाश्चिमात्य कला जाणतो व खोल पाहतो, तो मान हलवतो; नाही, नाही, असें म्हणतो; ही स्तुति योग्य नाही, असें तो मानेने सांगतो. सृष्टींतील खरें सौंदर्य, परमोच लावण्य हें लपलेलें असतें; तें आध्यात्मिक असतें; तें सापडत नाही, पकडता येत नाही; इंद्रियांच्या पकडींतून तें निसटतें. सृष्टीचें खरें सौंदर्य आत्म-सौंदर्याप्रमाणे आहे. ग्रीककलेंतील अत्यंत मनोरम असें चित्र–अत्यंत मनोहर असा नमुना मी जो पाहिला, तो ज्याला हेन ''मिलोची प्रिय रमणी'' असें वर्णितां झाला तो नव्हे; हंसावर बसून चालणारी एक कुमारी. मला हें दृश्य अत्यंत सुंदर वाटलें. केस नीट पट्ट बांधलेले, शारीरिक सौंदर्य विलासापेक्षा विशुद्धता दर्शवणारें, जणु उषाबालाच चालली आहे कोणी, असें वाटतें. हा कलावान् केवळ शारीरिक सौंदर्य पाहणारा नाही, केवळ हात, पाय, शिरा यांत सौंदर्य भरून राहिलें आहे, असें मानणारा तो नव्हता; तर सर्वत्र सौंदर्य पाहणारा होता; सौंदर्याच्या अनेक तऱ्हा पाहणारा होता; एकच सौंदर्य–परंतु तें अनेक रूपांनी उभें राहतें; तें अनंत रूपें तो पाहणारा होता.

आजच्या कलोपासकांना, कलाभ्यासकांना मी जें सांगत आहें, तें कदाचित् श्रद्धार्ह वाटणार नाही, मी जें सांगत आहें, तें त्यांना पटणार नाही, तरी पण मीं

सागतें की, हिंदु गतधवेचा खिन्न चेहरा, त्या चेहऱ्यावरील शरणागति दर्शवणारें स्मित, चेहऱ्यावरील सर्वव्यापी दु ख, ती करुणा— हें चित्र काढणें जास्त उदात्त आहे, काढण्यालायक आहे हें चित्र, आणि कठीणही आहे धनयौवनमत्त, धष्टपुष्ट प्रमदांचीं व युवकांचीं चित्रें काढण्यापेक्षा हें गभीर चित्र काढणें किती कठीण व किती उदार ! मायकेल एंजेलोचें जें सुप्रसिद्ध मॅडोनाचें चित्र—त्याबद्दल अनुभवी व तज्ज्ञ युरोपियन चित्रकलाप्रेक्षक टीकाकार म्हणतात की, त्या चित्रातही सुदर रोमन नारी दिसत नसून मॅडोनाचेंच मन व स्वभाव दिसून येत आहे चित्र म्हणजे फोटो नव्हे कला म्हणजे शास्त्र नव्हे निर्मिति म्हणजे अनुकृति नव्हे लखनौ व कृष्णनगरच्या बाजारांतील मातीचीं चित्रेंहि—शिल्पकलेचा उच्च नमुना दाखवतात, रमणीय असतात तीं चित्रें, परतु सृष्टीशीं सत्य राहणें, यथार्थदर्शन कलेंत घडवणें, ही जरी कलेची कसोटी धरली, तरी कोठें बिनसलें ? लखनौच्या चित्रशाळेंत अयोध्येच्या नबाबाच्या ज्या मोठमोठ्या तसबिरी आहेत, त्याचें काय करावयाचें ? या मोठमोठ्या तसबिरी लहान आकारावरून वाटलेल्या आहेत, परतु हे येथील आकार, किती भव्य आहेत काढलेले ! अशीं भव्य चित्रें पाहिलीं होतीं कोणी अन्यत्र ? दिल्लीहून पाठवलेला पहिला सुभेदार— काळाकडे व सृष्टीकडे टक लावून पाहणारा,'अनंत आशा हृदयात खेळवणारा व मुखावर दाखवणारा, त्याच्या वेळेपासून तों शेवटच्या नवाबापर्यंत सारे तेथे चितारलेले आहेत जणु ते जिवत आहेत, असें वाटतें सर्वांत कमी आकर्षक चित्र आसा उद्दौला-- मावळता —त्या नबाबातील सर्वांत मोठा, त्याचें आहे, परतु ते सारे तेथे चितारून ठेवलेले आहेत त्यांचा तो एक पूर्वज— जो अत्यंत सुदर होता-- ज्याचीं चित्रें आजही प्रेमानें लोक विकत घेतात व आपली अमोल वस्तु म्हणून मानतात— त्याचेंहि चित्र तेथे आहे

सत्यदर्शन पाश्चिमात्य कलेंतच आहे, असें नाही इतरत्रही निरनिराळ्या तऱ्हेने सत्यार्थ प्रकट झालेला असलाच पाहिजे एखादें थोर चित्र पाहून आपणास जो आनद होतो, तो ' निसर्गच हें चित्र रगवीत आहे, ' या भावनेने होतो ग्रिफियच्या पुस्तकात आजिंठ्याच्या चित्रातील एक नमुना दिला आहे एक नारी देवतेचे पाय धरीत आहे, असें तें चित्र आहे ग्रीक चित्रकार मानवी देह जसा पहात, ज्या दृष्टीने पहात—प्रमाणबद्ध, सुदर, सामर्थ्ययुक्त, वाटोळा—त्याच दृष्टीने आजिंठ्याच्या गुहेंत चितारणाऱ्या त्या कलावानाने पाहिला होता, आणि मध्य-

कालीन कॅथोलिक चित्रकार आरम्याला ज्या तन्हेने पहात-प्रार्थना पिळवटून निघत आहे हृदयांतून- त्या वेळच्या आरम्याचें दर्शन तेंहि या चित्रकाराला झालें होतें. त्या चित्रकारानें पाश्चिमात्य व पौर्वात्य कलांचें मधुर मिश्रण केलें होतें. देह व आत्मा, बाह्य व आंतर-उभय प्रकारचें सौंदर्य पाहणारे त्याचे डोळे होते. या अशाच तन्हेने भावी भारतीय चित्रकला विकसित होत गेली पाहिजे; अशाच रीतीने तिने सौंदर्य प्रकट केलें पाहिजे. भारतवर्षानें दोन महान् वस्तु दिल्या आहेत. कलेचा अभ्यास करणाऱ्याला दोन देणग्या दिल्या आहेत. मानवी आकार जाणणें, ओळखणें, व उत्कट भावना कशा प्रतिबिंबित होतात, प्रकट होतात, विशेषतः पूजेमध्ये व प्रार्थनेमध्ये प्रकट होतात, तें जाणून घेणें, या दोन गोष्टी भारतांत सर्वत्र पहावयास मिळतील!

जर भारतीय चित्रकलेंत देह व मन, दोघांचें सौंदर्य रेखाटण्याची शक्ति आहे, तर मग पाश्चिमात्य कलेच्या मागे भारतीय कलापूजक का जातो? काय मोहनी त्याला पडते? माझ्या मतें तरी एकच आकर्षण आहे. प्रत्येक वैयक्तिक कलावंताला युरोपने स्वातंत्र्य दिलें आहे. युरोपमधील कला ज्ञातिविशिष्ट, जातिविशिष्ट नाहीं. वाटेल त्यानें कलेचें उपासक व्हावें, युरोपमध्ये कला म्हणजे वंशपरंपरागत धंदा नाही. अर्वाचीन काळीं तरी कला म्हणजे तेथे जणु भाषाच झाली आहे. या जगाबद्दलचे आपले विचार थोर विशालबुद्धि पुरुष कलेच्या द्वारें बोलून दाखवतात. कला म्हणजे जणु काव्याचाच एक प्रकार व म्हणून ज्याला ज्याला स्फूर्ति असेल, त्याला त्याला ती मोकळी आहे; स्फूर्तीनें कोणीही तिला वरावें; मग ती स्फूर्ति कोणाच्या वा हृदयांतील असेना! परंतु भारतवर्षांत निराळें आहे. कला भारतवर्षांत जणु धंद्याप्रमाणे मानली गेली, मानली जाऊं लागली; ती कमीअधिक प्रमाणांत जातिनिविष्ट, जातिमर्यादितच झाली.

वंशानुवंश त्याच जातींत ती कला येत असल्यामुळे हें पूर्वजांचें कौशल्य त्या त्या जातींत जमा होत राही. उदाहरणार्थ सुवर्णकारांची गोष्ट घेऊं. बाहेरचे कारागीर येतांच-एकाएकीं येतांच-सोनारांच्या अभिरुचीचा, कौशल्याचा, ज्ञानाचा अधःपात झाला, ही गोष्ट आपल्या लगेच लक्ष्यांत येईल. त्याचप्रमाणे रंगवण्याची कला; तिच्यांतही अधःपतन झालें आहे. वंशानुवंश जे धंदेवाईक कलावान् होते,

कारण सर्व चितारी बहुधा मजूरच असतात, श्रमजीवी असतात! परंतु ते श्रमजीवी असले तरी ते कवि आहेत, भविष्यकाळाचें दर्शन स्वतः घेऊन इतरांना घडवणारे ते ऋषि आहेत, तत्त्वज्ञ आहेत. ते भविष्यकाळाचीं स्वप्नें पाहतात व रेखाटतात. सामाजिक दृष्टया आज भारतांत कलेमध्ये क्रांति होत आहे. तेराव्या शतकांत युरोपमध्ये अशीच चित्रकलेंत क्रांति होत असतां—त्या क्रांतिकाळांतील चित्रकाराग्रणी गिओटो याने जशी त्या काळांतील परमोच्च संस्कृति आपल्या अमर चित्रांत ओतली आहे; जें फ्लॉरेन्स शहर डान्टेच्या डिव्हाईन कॉमेडीने तल्लीन व मुग्ध होऊन गेलें होतें, त्या फ्लॉरेन्सला गिओटोने दगडांत—पाषाणांत खोदलेलें 'डिव्हाईन कॉमेडिया' काव्य अर्पण केलें—त्याचप्रमाणे आज भारतांतील क्रांतिकाळांतील चित्रकारांनी जुनीं बंधनें व रूढि झुगारून, मुक्त होऊन, नवीन आपल्या काळांतील भावना, विचार, आपल्या काळांतील मन, हृदय हीं चितारायला उभें राहिलें पाहिजे. ही नवीन पूजा त्याने सुरू करावयाची आहे. अत्युच्च कला जणु कांही विजेने भारलेली असते. आध्यात्मिक विद्युत् तिच्यांत स्फुरत असते. बौद्धिक व हार्दिक गोष्टींचें प्रकटीकरण करीत असते. नवभारताच्या चितार्‍यांनीं नवभारताचें मन व बुद्धि चित्रांत दर्शवली पाहिजेत. यासाठी अत्यंत गंभीर, खोल व उत्कृष्ट असें व्यापक शिक्षण त्यांना मिळालें पाहिजे. आपल्या काळांतील संस्कृतीच्या सिंधूंत जो डुबलेला नाही, जो चुबकळून आलेला नाही, त्याला ती संस्कृति अमर अशा कलेच्या रूपाने कशी प्रकट करतां येणार ? स्वकालीन संस्कृतींत घुसून गेली पाहिजे त्याची वृत्ति. काळाशीं त्याने एकरूप झालें पाहिजे; राष्ट्राच्या ध्येयाशीं, भवितव्यतेशीं, झगड्यांशीं, आकांक्षांशीं त्याने एकरूप झालें पाहिजे. तरच त्याचें प्रतिबिंब कलावंताला कलेंत उत्कटपणें ओततां येईल. राष्ट्रीय झगड्यांत ज्याचें जीवन रंगलें नाही, तो राष्ट्राच्या हृदयांतील आशांचा अर्थ दुसर्‍यांस काय सांगणार !

समाजांत जेव्हा नवयुगोदय होत असतो, क्रांति होत असते त्या वेळेस

त्यांच्या आभिरुचि, त्यांचे नमुने दूर फेकले गेले; अननुभूत असे नवीन प्रकार आले. रंगाच्या बाबतींत जे अडाणी आहेत, रंगज्ञान, रंगाभिरुची ज्यांना नीठ समजत नाही, अशा लोकांच्या अभिरुची आज समाजांत बोकाळल्या आहेत. जरी आजही भारतीय रंगकाम सुंदर व झळाळीत दिसतें, तेजस्वी दिसतें, तरी पूर्वीची ती रंगकामांतील चारुता गेली व आज अशी स्थिति येऊं लागली आहे, असले रंग व रंगकाम दिसतें की, आनंदाने हृदय हसण्याऐवजी रडूंच येतें.

परंतु त्याचबरोबर एक गोष्ट लक्ष्यांत ठेवावयास हवी, ती ही की, जुन्या पद्धतींतील तोच-तोपणा-नाविन्याचा अभाव, नवकल्पनांचा अभाव, यामुळेहि जरा नवीन दृष्टीस पडतांच, त्या जुन्याचा एकदम सर्वांनी त्याग केला. आपल्याच प्रतिभा-क्षीणतेने आपलें कलासुभगत्व गेलें, आपले नमुने गेले; कारण जी कला एकाच जातींत रहाते, वंशानुवंश परंपरेने एकाच जातींत चालत असते, तिच्यांतील नाविन्य जातें; तेच ते नमुने, तेच तेच प्रकार असें त्यांत होऊं लागतें; कला जणु रूढिबद्ध होते, दासी होते. ती स्वतंत्र रहात नाही; इकडेतिकडे उडत नाही. कलेचा आत्मा एकाच पिंजऱ्यांत शतकानुशतकें कोंडला जातो. मग समाजाचें मन, राष्ट्राचें मन बंड करतें; नवीन कलेच्या आदर्शांकडे, नवीन कलाविकासाकडे तें धावतें. चित्रकलेच्या बाबतींत तर हें निःसंशय सत्य आहे. दिल्ली, लखनौ येथील तसबिरी चांगल्या असतील; वंशपरंपरा आलेल्या चिताऱ्याकडून त्या काढलेल्या असतील; परंतु त्यांत नवीनता दिसत नाही; नवीनता निर्माण करण्याची शक्ति त्या कारागिरांच्या बोटांत व हृदयात दिसत नाही. आकार काढण्याची नवीन रीत, नवीन ढब, त्या चित्रकाराना सुचेना; कारण जातीमुळे सवयी निर्माण होतात; सवयीने कौशल्य वाढतें, परंतु प्रतिभा व कल्पना मरून जाऊं लागतात.

कोणत्याहि एका जातीचे चित्रकार उद्याच्या राष्ट्रीय भारतांत राहणार नाहीत कोठेहि चित्रकार उत्पन्न झालेला असो. या साऱ्या चित्रकारांचा जो संप-त्या संघाचें पहिलें कर्तव्य हें आहे की, विशालता व कल्पनेची स्वतंत्रता यांची प्रथम पूजा करावयाची! हे नवभारताचे नव चितारी कलेचा विषय शोधून काढण्यांत, निवडून काढण्यांत बद्ध नाहीत; कोणतीही वस्तु, कोणतेंहि दृश्य त्यांनी रंगवावें, व तें कशाही रीतीनें रंगवावें. अमुकच पद्धतीने रंगवलें पाहिजे, काढलें पाहिजे असें नाही! ते मजूर आहेत, ज्याप्रमाणे त्यांचे वाडवडील मजूर होते.

कारण सर्व चितारी बहुधा मजूरच असतात, श्रमजीवी असतात। परंतु ते श्रमजीवी असले तरी ते कवि आहेत. भविष्यकाळाचें दर्शन स्वतः घेऊन इतरांना घडवणारे ते ऋषि आहेत, तत्त्वज्ञ आहेत. ते भविष्यकाळांचीं स्वप्नें पाहतात व रेखाटतात. सामाजिक दृष्टया आज भारतांत कलेमध्ये क्रांति होत आहे. तेराव्या शतकांत युरोपमध्ये अशीच चित्रकलेंत क्रांति होत असतां–त्या क्रांतिकाळांतील चित्रकाराग्रणी गिओटो याने जशी त्या काळांतील परमोच्च संस्कृति आपल्या अमर चित्रांत ओतली आहे; जें फ्लॉरेन्स शहर डान्टेच्या डिव्हाईन कॉमेडीनें तल्लीन व मुग्ध होऊन गेलें होतें, त्या फ्लॉरेन्सला गिओटोने दगडांत–पाषाणांत खोदलेलें 'डिव्हाईन कॉमेडिया' काव्य अर्पण केलें–त्याचप्रमाणे आज भारतांतील क्रांतिकाळांतील चित्रकारांनी जुनीं बंधनें व रूढि झुगारून, मुक्त होऊन, नवीन आपल्या काळांतील भावना, विचार, आपल्या काळांतील मन, हृदय हीं चितारायला उभें राहिलें पाहिजे. ही नवीन पूजा त्याने सुरू करावयाची आहे. अत्युच्च कला जणु कांहीं विजेने भारलेली असते. आध्यात्मिक विद्युत् तिच्यांत स्फुरत असते. बौद्धिक व हार्दिक गोष्टींचें प्रकटीकरण करीत असते. नवभारताच्या चितान्यांनीं नवभारताचें मन व बुद्धि चित्रांत दर्शवलीं पाहिजेत. यासाठी अत्यंत गंभीर, खोल व उत्कृष्ट असें व्यापक शिक्षण त्यांना मिळालें पाहिजे. आपल्या काळांतील संस्कृतीच्या सिंधूंत जो डुबलेला नाही, जो चुबकळून आलेला नाही, त्याला ती संस्कृति अमर अशा कलेच्या रूपाने कशी प्रकट करतां येणार ? स्वकालीन संस्कृतींत मुरून गेली पाहिजे त्याची वृत्ति. काळाशीं त्याने एकरूप झालें पाहिजे; राष्ट्राच्या ध्येयाशी, भवितव्यतेशीं, झगड्यांशीं, आकांक्षांशी त्याने एकरूप झालें पाहिजे. तरच त्याचें प्रतिबिंब कलावंताला कलेंत उत्कृष्टपणें ओततां येईल. राष्ट्रीय झगड्यांत ज्याचें जीवन रंगलें नाही, तो राष्ट्राच्या हृदयांतील आशांचा अर्थ दुसऱ्यांस काय सांगणार ?

समाजांत जेव्हा नवयुगोदय होत असतो, क्रांति होत असते, त्या वेळेस एकच विचार सर्वांच्या हृदयांत भरून राहिलेला असतो. '**समानी व आकूतिः समाना हृदयानि वः–**' अशी स्थिति आहे. सर्वत्र एकच सूर ऐकूं येतो, एकच दृश्य दिसतें. सर्वांचें एक मन, एक हृदय, एक ध्येय. ही जी ध्येयैक्यता, हृदैक्यता, हा जो उत्साहपूर, तो कोपऱ्यांत बसलेल्या कलावानाला आपल्या भरतीबरोबर नाचवतो. तोही या विराट् सिंधूंत डुंबूं लागतो. स्फूर्तिसागरांतील पाटांवर नाचूं

निबंध २ रा:

## कलेचा संदेश

भारतांतील कला आध्यात्मिक संदेश सांगणारी आज आहे; आजची उदयोन्मुख भारतीय कला राष्ट्रीयतेच्या भावनेने भारून गेलेली आहे. हा जर संदेश प्रत्यक्ष प्रकट करावयाचा असेल, बोलून दाखवावयाचा असेल, तर चित्रकाराला कला पोटाचें एक साधन म्हणून अतःपर मानून चालणार नाही; पोट भरावयाचा भाकरीचा धंदा म्हणून कलेकडे पाहण्याचें सोडून दिलें पाहिजे; तर कला म्हणजे शिक्षणाचें, परमोच्च शिक्षणाचें परमोच्च साधन या दृष्टीनें त्यानें कलेकडे पाहिलें पाहिजे. म्हणून आज भारतांतील कलाशाळा विद्यापीठ झाली पाहिजे. कलेचा अभ्यास करणाऱ्यांच्या समोर देशांतील, राष्ट्रांतील सर्व महत्त्वाचे प्रश्न उभे असले पाहिजेत. त्यांनी या गोष्टींच्या अभ्यासाव्यतिरिक्त वेळांत चर्चा केल्या पाहिजेत; राष्ट्रीय झगड्याशीं, राष्ट्रीय आकांक्षांशीं आपलें जीवन एकरूप केलें पाहिजे. विद्यार्थ्यांमधलि बोलणेंचालणें याच गोष्टीचें चाललें पाहिजे. जगांतील सारीं गूढ रहस्यें जाणण्याच्या इच्छेने, प्रेरणेनें त्यांचें वाचन सुरू झालें पाहिजे. उदात्ततेकडे जाण्यासाठीं कलोपासकांनी वेडें झालें पाहिजे.

जें जें महनीय आहे, दिव्य-स्तव्य आहे, धगधगीत आहे, तें उत्कट ध्येयाचे भक्त असे जे विद्यार्थी त्यांच्या हृदयांत जन्म घेत असतें. उत्कट, भावनोत्कट विद्यार्थी जमले—त्यांचा संघ बनला— तर ते महत् निर्माण करतील, कांहीतरी दिव्य करून

भारतातील कलासेनात ते क्रांति घडवून आणतील. काही कल्पोपासकांना स्वतः-समोरील गंभीर प्रश्नाची उत्कटता व उज्ज्वलता पटू दे, व्यापकपणाने ती त्यांना समजावून घेऊं दे—आणि मग नवकलेचा जन्म झालाच समजा. जीवनातून जीवन निर्माण होतें, चैतन्यातून चैतन्य प्रकटतें, तेजातून तेज प्रसव होतो, चैतन्य-चल्नेशिवाय, चित्प्रेरणेशिवाय काय मिळणार ?

चित्रकार राष्ट्रीय कसा व्हावयाचा ? चित्रकार हा राष्ट्रीयतेचा चित्रकार, राष्ट्रीय आकांक्षा रंगवणारा चित्रकार कसा होणार ? हें शक्य आहे का मनुष्याला ? अमूर्त कल्पनेला मूर्त करता येते की नाही, तिला पोषाख देता येतो की नाही, तिला आकार देता येतो का नाही, त्या आकारात रक्त, मांस, प्राण ओतता येतात का नाही ? अमूर्त भावना रंगवता येते की नाही ? निःसंशय येते जर आपणास कधी शंका आली असेल, तर अवनींद्रनाथ टागोरांच्या भारतमातेच्या अनुपम सुंदर चित्राने ती शंका केव्हाच निरसन झाली असेल परंतु हें सर्वें चुटकीसरसें होणार नाही कलावानाच्या मनाची उत्कृष्ट परिणति व विशाल ज्ञानादिवाद अमूर्ताला मूर्त करण्याची ही सिद्धि प्राप्त होणार नाही नवशिक्याला तर हें अशक्य आहे पहिल्या पायरीवर ज्याचा पाय आहे, त्याला मूर्तिदर्शन मूर्तिभेट कशी होणार ? त्याने या शक्तीकडे कसें जावयाचें ? कसा मार्ग आक्रमावयाचा ? अशा प्रकारचे आदर्श व थोर आकार, थोर विचारांना थोर मूर्त रूप देण्याची ही शक्ति, ती त्याला हळूहळू पण निश्चितपणें कशी मिळत जाणार ? कसें त्याने पुढेपुढे जावें ?

पहिली गोष्ट ही की, आपल्या दृष्टीने आपणास जो आनंद होतो, त्याच्याशी कलेचा संबंध आहे कला ही दृष्टिद्वारा आनंदवितरण करते, कलेचा हेतु, उद्देश आनंद-दान हा आहे ज्ञान-दान हा नाही तो मुख्य उद्देश नाही जें चित्र केवळ ज्ञान देतें, तें चित्र नसून ती एक भूमितीतील आकृति असेल, सृष्टिशास्त्रातील, रसायनशास्त्रातील काही यंत्राकृति असेल. म्हणून चित्रकाराला पहिली अत्यावश्यक अशी गोष्ट आहे, ती ही की, त्याला दृष्टीला आनंद देता आला पाहिजे दृष्टीचें स्वरूप त्याने ओळखलें पाहिजे. झटकन त्याला निश्चय करतां आला पाहिजे-असें चित्र रंगवलें, येथे छाया दाखविली, येथे रंग जरा भडक दिला, तर आपणास आवडेल की आवडणार नाही, हें तात्काळच त्याला निश्चित करता आलें पाहिजे

जर हें ज्ञान नसेल तर कला चुकेल वाटेल तो देखावा कलेचा विषय होत नसतो. काय गाळावें हें कलावान् जाणतो हें जाणतो तोच कलावान् हल्लीच्या भारतवर्षात तरी या गोष्टीवर जास्त जोर दिला पाहिजे. आजकाल वाटेल त्या वेड्यावाकड्या अभिरुची उत्पन्न होत आहेत, लोकांच्या अभिरुचीचा चुथडा होत आहे. चुकीच्या व भिकारड्या फॅशन्स अस्तित्वात येत आहेत. अशा वेळेस लोकांच्या सदभिरुचीस जागृत करणें, हें कलावानाचें काम आहे **'सत्यं शिवं सुंदरं'**ची कलावान् उपासना करतो व करायला राष्ट्राला शिकवितो आज हिंदुस्थानातील प्रत्येक घरात शकुंतलापत्रलेखन म्हणून एक चित्र टांगलेलें असतें एक तरुण प्रमदा खुशाल आडवी पडून कमलपत्रावर पत्र लिहीत आहे, असें हें चित्र असतें हा चित्रातील तें दृश्य भारतवर्षात तरी कुसंस्कारच निर्माण करण्यास उपयोगी पडेल. जें चित्र, जें दृश्य प्रत्यक्ष संसारात जर आपण आज पाहिलें, तर विनयभंगाचें, शालीनताहीनतेचें म्हणून मानूं, तें कल्पनेंत तरी सुंदर कसें दिसेल ? ज्या या भारतवर्षात प्रेमविषयक प्रसंग कधीही प्रकट केले जात नसत– समाजात चव्हाट्यावर मांडले जात नसत, जेथे प्रेम झाकलेलें– हृदयात लपलेलें असेंच ठेवण्यात आनंद वाटे– त्या या भारतवर्षात सुभद्राहरणाचीं व शकुंतलापत्रलेखनाचीं चित्रें घरोघर टांगलीं जात आहेत

खोट्या ध्येयामुळे या चुका होतात आपल्या हृदयातील भावनांशीं आपण सम्यक्, सत्यनिष्ठ राहिलें पाहिजे जें चित्र काढीत असता आपल्या स्वत च्या मनालाही फसवल्यासारखें होईल, तें चित्र आपण काढता कामा नये. आजच्या काळात– या प्रेमस्वातंत्र्याच्या काळात– बंधनाच्या पलीकडील काळात अशीं चित्रें काढणेंच बरोबर, असें चित्रकाराला वाटतें, त्यातच नवसंस्कृति आहे, असें त्याला वाटतें व पाहणाऱ्यालाही वाटतें असल्या चुकीच्या समजुतीमुळे एका हिंदी मुलीला एका पाश्चिमात्य चित्रकाराच्या नग्न चित्राचे काही फोटो विकत घेताना– ते रद्दी सौंदर्यहीन फोटो विकत घेताना– मी पाहिलें आहे. ती मुलगी म्हणाली, "सर्व चित्रात हींच चित्रें मला फार आवडलीं !" त्या मुलीची सहृदय प्रेक्षकास करुणा आली, त्यांनी मनात कल्पना केली की, या मुलीनें नीट विचार केलेला नाही, तिनें विचारपूर्वक चित्राची निवड केलेली नाही, परंतु तिनें कल्पना करून घेतली की, "हीं चित्रें चांगलीं असणारच" एखाद्या हिंदी माणसाच्या बंगल्यातही सिगारेट

ओढणाऱ्या किंवा अशाच प्रकारें स्वतःची करमणूक करून घेणाऱ्या, मजा करणाऱ्या स्त्रियांचीं चित्रें टांगलेलीं आढळणें आता फॅशन झाली आहे ! असलीं चित्रें जर दिवाणखान्यांत उघड लावून ठेवलीं, तर युरोपियन लोकांना अपमान वाटतो ! ते या गोष्टीला हीन मानतात, असभ्य मानतात ! युरोपियन घरात अशीं चित्रें उघडयावर बैठकीच्या ठिकाणीं दिसलीं तर आपला जाणूनबुजून हा अपमान केला असें पाहुणा मानील !

अशा चुका का होत आहेत ? कारण आपण दगडासारखे भावनाशून्य बनून एखादी वस्तु सुंदर मानली जाते, उच्च कला मानली जाते, म्हणून आपणही त्या कलेच्या पाठोपाठ जाण्याचाच प्रयत्न करीत आहोंत. जग ह्याला चांगलें म्हणतें, आपणही म्हणूं या ! सारा परप्रत्ययनेय बुद्धीचा खेळ चालला आहे. आंधळेपणा चालला आहे. ती कला सुंदर नसते, उच्च नसते; परंतु उच्च व सुंदर का मानतात, तर तें चित्र पाहून इंद्रियांना सुख वाटतें, मनाला गुदगुदल्या होतात ! विकारांना उत्तेजन लाभतें !

नग्न चित्रें समजावयास हिंदुस्थानांत तसें विशिष्ट शिक्षण मिळालेलें नाही. या नग्न चित्रांच्या बाबतीत सारासारविवेक हिंदी दृष्टीला करतां येणार नाही. भारतांत तर दिगंबर चित्रें– अर्धवट नग्न चित्रें हीं बहुधा टाळलीं जातात. कोणी चोरूनच तसलें चित्र पाहील. तें चित्र पहाण्यास लाज वाटेल. अशा बाबतींत आपल्या चुका झाल्या, तर नैतिक दिव्यता नाहीशी होईल. थोर नीति रसातळास जाईल ! नग्न चित्रांत एक प्रकारची गूढ आदरयुक्त अशी दिव्यता असते; परमपूज्यतेचा भाव असतो. त्यांत देहाच्या पलीकडचें आत्मदर्शन असतें. लिंगभेदातीतता तेथें असते. निदान 'व्हीनस ऑफ मिलो' याच्या कलेंत, तसेंच डोनॅटेलो यानें एक मुलगी आपल्या पायांतील काटा काढीत आहे असें चित्र काढलें आहे त्या चित्रांत, किंवा अर्वाचीन काळांतील जी. एफ्. वॅट्स यानें काढलेलें "Triptych of Love" हें चित्र–या नमुन्यांतून मानवी आकाराला या केवळ शरिरांत न कोंडतां त्याला आध्यात्मिक, आंतरिक अर्थानेही भरून ठेवलें आहे; मानवी आकार जास्त सुंदर व खोल केला गेला आहे; परंतु नग्न चित्र पाहतांना भेदातीत ज्याची दृष्टि झालेली नाही, या बाह्य शरिरापलीकडे पाहण्याची ज्याच्या दृष्टीला सवय नाही, हें सौंदर्य पाहणारे ज्याला डोळे नाहीत, ज्याना परकीय अशा कलेचा अनुभव नाही,

त्याना नग्न चित्रांतील लिंगातीत रूप पहा असें म्हणणें मूर्खपणाचें आहे. ती शब्दाची वाफ फुकट दवडणें आहे. भारतात उत्कृष्ट नियम म्हणजे नग्न चित्राना अजिबात फाटा देणें हाच होय.

डोळ्याला नीट तरबेज केलें पाहिजे. सुंदर काय, कुरूप काय, हे डोळ्याना पटापट ओळखतां आलें पाहिजे. पाण्यातून हंस दूध काढून घेतो, त्याप्रमाणे कलावान् कुरूपतेंतून सुरूपता पाहतो. कोंबडा मातींतून दाणा शोधून काढतो तसा कलावान् असतो. सौंदर्य पहावयास त्याचे डोळे अधीर झालेले असतात. काय टाकावयाचें, काय स्वीकारावयाचें, त्याज्य काय, संग्राह्य काय, या बाबतींत दृष्टीवर विश्वास ठेवतां येईल, इतकी तरबेज ती झाली पाहिजे. डोळा असा तयार करणें हें फार महत्त्वाचें काम आहे व तें कठीणही आहे.

भारतीय कला कधी कधी जास्त बुद्धिप्रधान झालेली (technical) दिसते. शास्त्र-प्रधान झालेली दिसते. कलावानाची जी आतील स्फूर्ति ती पुष्कळ वेळा त्यामुळे मारली जाते व खऱ्या कलेचा प्राण जातो. लाहोरच्या म्युझियममध्ये प्रथम आपण पुष्कळ प्राचीन शिल्पकलेचे नमुने पाहतों— त्या शिल्पकलेवर बॅक्ट्रियन किंवा चिनी कलेचा परिणाम झाला असेलही किंवा नसेलही—परंतु हे नमुने पहात पहात आपण उपवास करणाऱ्या बुद्धाची कृश अशी एक मूर्ति पाहतों. जयपूरच्या म्युझियममध्ये कालीची अस्थिपंजरमयी मूर्ति आहे असें म्हणतात, परंतु असे हे प्रकार चुकीचे आहेत. कला मरत चालली असें यावरून समजून येतें. कलेचा ऱ्हासकाल, विनाशकाल या चित्रावरून प्रतीत होतो. कला म्हणजे शास्त्र नव्हे. सौंदर्यशोधन हें कलेचें खरें काम. जें वैषयिक सौंदर्य तेंच केवळ सौंदर्य नाही, परंतु सौंदर्य हा कलेचा प्राण आहे. कलावानाला काही गोष्टींना नकार दर्शविण्याचा अधिकार आहे. जी गोष्ट त्याच्या हेतूला पोषक नसेल, ती त्यानें दूर करावी. जें जें त्याच्या हृदयाला कुरूप वाटेल, सौंदर्यहीन, कलाहीन वाटेल, त्याला त्यानें जागा देतां कामा नये. बुद्धाची ती कृश मूर्ति पाहून, आपणास जर असें वाटलें की, कलावंताला तींत सौंदर्य दिसलें म्हणूनच त्याने ती मूर्ति घडवली, तर त्याची स्तुति करा, परंतु तसें तुम्हाला वाटलें नाही तर त्याचा निषेध करा.

सृष्टींत सारेंच सुंदर नाही तर कांही असुंदरही आहे कलावानाला

नेहमी सृष्टीच्या बाजारात धुडाळून आपले साहित्य जमवावें लागेल सृष्टि अनंत आहे, विविध आहे, विपुल आहे चित्रात काहीहि क्षुद्र व नीच असू नये, तेथ गोंधळ असू नये, मलिनता असू नये, घाण असू नये; अस्पष्टता असू नये चित्र निर्मळ असावें ज्या देखाव्यात प्रकाश नाही तो देखावा क्वचितच सुंदर असू शकेल प्रकाशहीन, तेजोहीन दृश्य हें रमणीय कसें असणार ? चित्रात दाखवलेलें पाणी त्याच्यावरही प्रकाश नसेल, तर तें अर्थशून्य दिसेल, लंडनच्या राष्ट्रीय चित्रसंग्रह मंदिरात डच चित्रकाराचीं चित्रें आहेत मला काही काही डच चित्रें फार आवडत मी त्याचें कौतुक करीत असें हीं चित्रें मला का मोहनी घालीत, तें मात्र मला समजत नसे डी हूग नावाच्या चित्रकाराने रगवलेलीं तीं चित्रें होतीं त्या चित्रात लहान लहान अगणें दाखवलेलीं होतीं, स्वयपाकगृहें दाखवलेलीं होतीं, त्यातील फरशी लालसर रंगवलेली होती ! त्या चित्रातील विषय फार गभीर उदात्त नव्हते त्या साध्या गोष्टी होत्या अगणें, स्वयपाकघरें व फरशा मलातरी चुलीपेक्षा मायकेल एंजेलोने काढलेल्या मॅडोनाच प्रिय वाटतात ! तरीपण मला तीं डच चित्रें आवडत का आवडत ? शेवटी मी माझें कोडें एका मोठ्या कलाभिज्ञाकडे नेलें त्याने माझ्या शंकेला पुढील शब्दात उत्तर दिलें, " डी हूग् हा अपूर्व चित्रकार आहे सूर्यप्रकाश कसा रंगवावा हें त्याच्याशिवाय कोणालाहि समजलें नाही त्याला सूर्यप्रकाश फार आवडायचा " कोडें उलगडलें; गूढ आत्म्यावरील पडदा उचलला गेला. माझें हृदय तीं चित्रें पाहून का उन्नत होई, का उचंबळून येई, तें मला कळलें मी पुन्हा तीं डी हूगचीं चित्रें पाहिलीं त्याने रंगवलेल्या त्या लाल विटा—त्याच्यावर सतत सूर्यप्रकाश पाडलेला मला दिसला

नाना प्रकारचे विरोध-भाव, यानीही सौंदर्य निर्माण होतें विरोधी भाव दर्शनाने रस उत्पन्न होतो ऐक्य असून, चित्रामध्ये एकता असूनहि त्यात विरोध हवा तो विरोध चित्राला पूर्ण करणारा हवा त्याचप्रमाणे रंगाचा विचार हिंदी विद्यार्थ्यांनी काढलेल्या पुष्कळशा चित्रातून-- ऑईलपेंट चित्रातून, प्रकाशहीन, निस्तेज तळी व त्याच्या काठच्या शाकारलेल्या झोपड्या आणि त्या सर्वांवर पसरलेली झाडाची छाया निळ्या हिरव्या रंगात– हें सारें रंगवलेलें होतें निरुत्साही निस्तेज देखाव्याचीं हीं निस्तेज चित्रें जरी यथार्थ असलीं, आपणास प्रिय

असणाऱ्या पुष्कळशा जागा जरी अशाच दिसत असल्या, जरी ही चित्रें बाह्यतः रचनादृष्ट्या, आकारदृष्ट्या सुंदर असलीं, तरी एखादा प्रकाशमय कुंचला, एखादा तेजोदायी ब्रश जर घरावर किंवा तळ्यावर किंवा पर्णावर कोठें दाखवला गेला असता, तर त्या एका ब्रशानें, एका कलमानें आश्चर्य घडून आलें असतें. रानांत जाणाऱ्या ध्रुवबाळाचेंही चित्र वरचेवर काढण्यांत येतें. या चित्रांत तर सारा गोंधळच दर्शवितात. एकहि प्रकाशकिरण तेथें दिसत नाही. निळसर, हिरवट भूमीवर कांहीतरी दाखवणें म्हणजे चित्र होत नाही. वनमार्गानें जेव्हां ध्रुव आपल्या ध्रुवध्येयाकडे जात होता, त्या वेळेस त्याच्या डोक्यावर अनंत अंबराचा चांदवा होता. त्या पसरलेल्या चांदव्याला लटकलेलीं अगणित हिरेमोतीं त्यानें पाहिलीं होतीं. विशाल स्वतंत्र आकाश– ना तेथें स्पर्धा, ना कोणा ताऱ्याला अनवकाश ! सारे तेथें चमचम करतात ! त्या आकाशानें, त्या लुकलुकणाऱ्या, चमचमणाऱ्या स्वतंत्र तारांनीं ध्रुवाच्या हृदयाला हाक मारली असेल ! अनंत अंबराचें अपूर्व आमंत्रण त्याला मिळत होतें ! व तो पुढेंपुढें वनांतून जात होता. वनाच्या मध्यभागीं, त्या झोपलेल्या शांतीच्या मंदिरांत तो जात होता. त्या भावना ध्रुवाच्या वनगमनाच्या काढलेल्या चित्रानें आपणांस सूचित होत नाहीत. ' ज्या गोष्टीनें आपणांस आनंद होतो, ती गोष्ट रेखाटणें, हें माझें कर्तव्य, ' असें जर कलावानाला मनापासून वाटतें, तर हें चित्र निराळेंच झालें असतें. जें नेहमीं पाहतों, तेंच त्यानें जसेंच्या तसें रंगवलें नसतें !

अशा रीतीनें खरें चित्र सूचक असलें पाहिजे; निर्मळ प्रकाशमय असलें पाहिजे. तिसरी गोष्ट म्हणजे चित्राचा विषयही सुंदर असावा. ज्या विषयानें, ज्या वस्तूच्या दर्शनानें हृदय उचंबळेल, आपणांस भक्ति-प्रेम वाटेल; उन्नत झालों असें वाटेल, असा विषय असावा ! भारतांतील रस्त्यांतून, नदीतीरावरून, शेतांभातांतून शेंकडों विषय व प्रसंग सर्वत्र पडले आहेत. जे सुंदर आहेत, त्या प्रसंगांतून दिव्य चित्रें निर्माण करतां येतील; परंतु ते प्रसंग पहावयास आपणांस हृदय हवें. कलावान् डोळयांनीं बघतो; परंतु डोळयांत हृदय येऊन बसलेलें असतें. डोळयांच्या खिडकींत हृदय येऊन बसतें व सृष्टीचें अवलोकन करतें. कलावानाच्या हृदयानें डोळयांतून पाहिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील ललना, त्यांचे अनंत वस्त्रप्रकार, हातांत काठी, लकडी व भिक्षापात्र घेऊन हिंडणारे व कपालभाली शिवाची कल्पना आणून देणारे

भिकारी, श्रम करणाऱ्यांची चित्रें तर साऱ्याच देशात तीं चांगलीं असतात, कारण *श्रम हा मुळातच रमणीय आहे; तो पाश्चिमात्य असो वा पौर्वात्य असो–परंतु* भारतातील श्रमजीवांचीं चित्रें रमणीयतर दिसतील, कारण येथील श्रमामध्येंही अपूर्व सौम्यता व स्निग्धता आहे, सुसंस्कृतपणा आहे, त्याचप्रमाणे मंदिरातील पुजारी–किंवा भटजी, नाव वल्हवून नेणारा नावाडी, मुलाला कडेवर घेणारी आई, लग्नाला निघालेली–पाटावर बसावयास जाणारी नोवरी! भारतीय विद्यार्थ्यांनो, या व अशाच प्रकारच्या शेकडो विषयात, शेकडो प्रसंगात रेखाङ्कित करण्यासारखें, चित्रात चितारून ठेवण्यासारखें तुम्हाला काहीच दिसत नाही का? तुम्हाला हे प्रसंग आपल्या कुंचल्याने चठवावे, असें नाही वाटत? अशी नाही का तुमच्या मनाला तळमळ व उत्सुकता? डोळ्यासमोर अनंत रम्य सृष्टि उत्पन्न करीत–विशाल कार्यक्षेत्र बघत–जीवनातून तुम्ही जाऊं शकत नाही काय? नाही का अशी कधीतरी दिव्य दृष्टि तुम्हाला लाभत? या अफाट देशात अनंत प्रकार *पडले आहेत कलावानाला येथे केवढी सृष्टि आहे!* इतर देशात अशी विविधता, अशी विपुलता, अशी सरसता व रमणीयता, दिव्यता व सुकुमारता नाही. *ख्रिस्ताचा जन्म किंवा कृष्णजन्माचा नंदोत्सव याचे प्रसंग प्रत्येक घरोघर आजही* भारतात नाहीत का? ते प्रसंग पहा व त्यातून साहित्य घेऊन ख्रिस्तजन्म रंगवा, कृष्णजन्म रंगवा सायंकाळ झाली की, तुळशीच्या अंगणात तुळशीजवळ केलेल्या कोनाड्यात पणती लावायला गृहलक्ष्मी जाते, त्यात नाही का तुम्हाला सौंदर्य दिसलें? सायंकाळ होत आहे, प्रकाश अधुक होत आहे, काळोख येत आहे–अशा वेळी शांतिजलसिंचनाचा प्रसंग, त्यात नाही का तुम्हाला गंभीर शांति अनुभवायला मिळाली?

एखादें निळ्या रंगाचें भांडें, एखादें झगमगीत ज्योतिर्मय फूल, एखादा सुंदर देखावा, किंवा काही सुखवस्तु सुखासीन लोकांचा संघ– एखाद्या बैठ्यीचें दृश्य– या गोष्टी रंगवणें म्हणजे चित्रकला, या गोष्टी रंगवणें म्हणजे चित्रकाराचें काम– एवढेंच त्याचें कार्य, असें कोणी स्वप्नातही समजूं नका रंग नीट नाही साधले, ते जरा ओबडधोबड असले तरी चालतील, परंतु त्या रंगाच्या पाठीमागे अंतरंगातील विचार–वेदना दिसूं दे म्हणजे झालें. चित्रकाराचा आत्मा प्रकट *होण्यासाठी धडपडतो आहे, असें त्या चित्रानें दिसूं दे म्हणजे झालें* प्रसूतिवेदना

पाहिजे. अगदी ओबडधोबड चित्र असलें तरी हरकत नाही; परंतु ज्या आकृति–ज्या मानवी आकृति–रंगवलेल्या असतील, त्या आकृतींच्या डोळ्यांच्या पापण्या गंभीर अर्थभाराने खाली वाकूं दे; विचारांच्या ओझ्याने खाली लवूं दे; त्या चित्राच्या पाठीमागे कल्पनासृष्टि, विचारसागर असूं दे, म्हणजे झालें. चित्र हें प्रतीक आहे, मूर्ति आहे. हृदयांतील भाव बोलणारें तें आहे. या भावांचा भरपूर भार चित्रांतील व्यक्तीच्या डोळ्यांवर दिसूं देत. त्या चित्राने हृदयाला, पाहणाऱ्याच्या मनाला कसलें तरी विचारदर्शन, ध्येयदर्शन घडूं दे. असूं दे रंग ओबडधोबड; फाटकेतुटके कपडे असले वरचे, तरी आंतील आत्मा सोज्ज्वल दिसूं दे, म्हणजे झालें. कारण शास्त्राप्रमाणे, शिक्षणाप्रमाणे, उद्योगधंद्याप्रमाणे, व्यापाराप्रमाणे कलाहि आज भारतमातेच्या उद्धारासाठीं उभी आहे. कलेची उपासना ही नवभारताला उभा करण्यासाठीं आज झाली पाहिजे. आज कलेचा दुसरा हेतु नाही; कलेला अन्य ध्येयदेव आज असतां कामा नये.



हें दाखवून पुन्हा कलोत्कर्ष भारतात होईल, असें तो भविष्य वर्तवतो. अजून भारतांत कलेचें रूप पीक येईल, कला अद्यापि दूषित झालेली नाही, असें या ग्रंथकाराचें तरी मत आहे येथले धंदे व कला अजून अदूषित आहेत. जोंपर्यंत हस्तकौशल्याला हिंदुस्थानात प्राधान्य आहे, तोंपर्यंत कलोत्पत्तीला सुपीक अशी मध्ययुगीन भूमीच येथे नांदेल युरोपमध्येही जोंपर्यंत हस्तकौशल्य होतें, हातानें धंदे चालले होते, तोंपर्यंत प्रचंड चर्च बांधलें गेलें व अमर चित्रें रंगविलीं गेलीं, परंतु द्रव्यदेव व यन्त्रदेव झालेल्या युरोपनें घोड्याला पूज्य मानून, हें हस्तकौशल्य झुगारून दिलें आहे.

हा ग्रंथकार म्हणतो की, " युरोपमध्ये आता जिवंत राष्ट्रीय कला नाही, –परंतु भारतात अजून परंपरागत, जिवंत राष्ट्रीय कला आहे भारतातील कला लोकांच्या सामाजिक व धार्मिक जीवनाशीं अद्याप संयुक्त आहे. कलेची लोकजीवनापासून फारकत झालेली नाही ही भारतीय कला, जर आपण नीट समजून घेऊं, तर युरोपीय व भारतीय यांच्यामध्ये ती अन्योन्य–सद्भाव व सहकार्य घडवून आणूं शकेल. युरोपच्या अध पतित व अराष्ट्रीय अशा संकुचित कलेचें या भारतीय जिवंत कलेशीं आज अल्पही साधर्म्य नाही, आणि आपण युरोपियन लोकांनी– रक्तानें, रंगानें, विचारानें, संस्कृतीनें, धर्मानें परकी असलेले असे जे आपण युरोपियन, अशा युरोपियनांनी–भारतीय कलेंत पुराणवस्तुसंशोधनापुरतें किंवा व्यापारापुरतेंच लक्ष्य दिलें आहे. हें दांभिक व वरपागी कौतुक आपण थोडेंफार दाखवलें आहे या कलेंतील गंभीर भाव आपणांपासून गुप्त राहतात कलेचें हृदय आपणासमोर उघडें नसतें राष्ट्राच्या हृदयातून प्रकट होणाऱ्या आध्यात्मिक आकांक्षा व तळमळी– ज्या तळमळी काव्यांत, संगीतात, कलेंत मूर्त होऊं पहात असतात–त्या आपणा युरोपियनांच्या हृदयात या भारतीय कलेच्या दर्शनानें उत्पन्न होत नाहीत. आपल्या हृदयातील तारा छेडल्या जात नाहीत "

परंतु या उताऱ्यावरून हिंदी वाचकांनी कांही फाजील आत्मप्रौढीची भ्रामक समजूत करून घेऊं नये " आपणामध्ये अजून जिवंत कला, परंपरागत राष्ट्रीय कला आहे, " एवढ्यानें जें जें आपणांस दिसेल, तें आंधळेपणानें, लहर येईल त्याप्रमाणे, विचार येईल त्याप्रमाणे, कलेचेंच आहे, असें मानणें, आपण जणु कलाप्रांतांत ईश्वराचा वरदहस्त माथ्यावर ठेवलेले अप्रमादशील कलावान् आहोंत, असें समजून घेणें, फार चुकीचें होईल इतर विषयात आपण असे फसणार नाही,

हें दाखवून पुन्हा कलोत्कर्ष भारतांत होईल, असें तो भविष्य वर्तवतो. अजून भारतांत कलेचें खप पीक येईल, कला अद्यापि दूषित झालेली नाही, असें या ग्रंथकाराचें तरी मत आहे येथले धंदे व कला अजून अदूषित आहेत जोंपर्यंत हस्तकौशल्याला हिंदुस्थानात प्राधान्य आहे, तोंपर्यंत कलोत्पत्तीला सुपीक अशी मध्ययुगीन भूमीच येथे नांदेल युरोपमध्येही जोंपर्यंत हस्तकौशल्य होतें, हाताने धंदे चालले होते, तोंपर्यंत प्रचंड चर्च बांधलें गेलें व अमर चित्रें रंगविली गेलीं, परंतु द्रव्यदेव व यन्त्रदेव झालेल्या युरोपने पोटाला पूज्य मानून, हे हस्तकौशल्य झुगारून दिलें आहे.

हा ग्रंथकार म्हणतो की, " युरोपमध्ये आता जिवंत राष्ट्रीय कला नाही, --परंतु भारतात अजून परपरागत, जिवत राष्ट्रीय कला आहे भारतातील कला लोकाच्या सामाजिक व धार्मिक जीवनाशा अद्याप संयुक्त आहे. कलेची लोकजीवनापासून फारकत झालेली नाही ही भारतीय कला, जर आपण नीट समजून घेऊं, तर युरोपीय व भारतीय यान्यामध्ये ती अन्योन्य-सद्भाव व सहकार्य घडवून आणूं शकेल युरोपच्या अध पतित व अराष्ट्रीय अशा संकुचित कलेचें या भारतीय जिवंत कलेशीं आज अल्पही साधर्म्य नाही, आणि आपण युरोपियन लोकानी--रक्ताने, रंगाने, विचाराने, संस्कृतीने, धर्माने परकी असलेले असे जे आपण युरोपियन, अशा युरोपियनानी--भारतीय कलेंत पुराणवस्तुसंशोधनापुरतें किंवा व्यापारापुरतेंच लक्ष्य दिलें आहे हें दांभिक व वरपागी कौतुक आपण थोडेंफार दाखवलें आहे या कलेंतील गंभीर भाव आपणांपासून गुप्त राहतात कलेचें हृदय आपणासमोर उघडें नसतें राष्ट्राच्या हृदयातून प्रकट होणाऱ्या आध्यात्मिक आकाक्षा व तळमळी-- ज्या तळमळी काव्यात, सगीतात, कलेंत मूर्त होऊं पहात असतात--त्या आपणा युरोपियनाच्या हृदयात या भारतीय कलेच्या दर्शनाने उत्पन्न होत नाहीत आपल्या हृदयातील तारा छेडल्या जात नाहीत "

परतु या उताऱ्यावरून हिंदी वाचकानी काही फाजील आत्मप्रौढीची भ्रामक समजूत करून घेऊं नये " आपणामध्ये अजून जिवंत कला, परपरागत राष्ट्रीय कला आहे, " एवढ्याने जें जें आपणास दिसेल, तें आंधळेपणाने, लहर येईल त्याप्रमाणे, विचार येईल त्याप्रमाणे, कलेचेंच आहे, असें मानणें, आपण जणु कलाप्रांतांत ईश्वराचा वरदहस्त माथ्यावर ठेवलेले अप्रमादशील कलावान् आहोंत, असें समजून घेणें, फार चुकीचें होईल इतर विषयात आपण असे फसणार नाही,

परंतु कला–प्रांतांत या स्तुतीनें फसण्याचा संभव आहे. जगांतील सर्व राष्ट्रामध्ये फक्त हिंदुस्थानांतच जिवंत असें परंपरागत राष्ट्रीय तर्कशास्त्र आहे, असें कोणी म्हटलें, तर तेवढ्यावरून भारतांतील प्रत्येक व्यक्ति चूक न करणारी आहे, अच्युत आहे, असें म्हणतां येणार नाही ! भारतीयांतील खरा भारतीय जरी एखादा घेतला, तरी त्यालाही नवद्वीपांच्या पंडितांजवळ न्यायशास्त्रांत वादविवाद करण्यापूर्वी, आपली मतें व आपले सिद्धान्त सत्य आहेत, नवद्वीपच्या पंडितांच्याविरुद्ध असले तरीही सत्य आहेत, असा आत्मविश्वास वाटावयास या न्यायशास्त्रज्ञाला किती अभ्यास करावयास हवा, किती बुद्धीला शिकवण द्यावयास हवी, विचारशक्ति व निर्णयशक्ति कशी सतेज राखली पाहिजे, हे न्यायाच्या बाबतींत सिद्धांत स्थापन करणें, सत्य शोधणें हें जितकें कठीण तितकेंच कलेच्याही बाबतींत न्याय्य व सत्य मत देणें कठीण आहे. सध्याच पहाना, आपल्या राष्ट्राची कलेच्या बाबतींत काय दुर्दशा झाली आहे ती ? आपणांत सारा गोंधळ माजला आहे. कोठेतरी आपण जात आहोंत व कलेचा अधःपात होत आहे व राष्ट्राचाही होत आहे. कला अधःपतित झाली की, राष्ट्रहि अधःपतित होतें. *या युरोपीय व्यापाराच्या वर्चस्वाखाली आपल्या सौंदर्य–कल्पनांचा जणु सत्यनाशच झाला. कशानें शोभा येते, कशानें साजुन दिसतें, तें कळेनासें झालें.* आपली अलंकरण–रुचि पार बदलली. आपलें *शिल्प स्वस्तपणाच्या इच्छेमुळे मेलें. आपणांस आज सारें स्वस्त पाहिजे आहे.* आपलीं उदात्त ध्येयें या स्वस्त व सवंग प्रसिद्धीच्या प्रीतीमुळे मरून गेलीं. या गोंधळांतून जर कधीकाळीं बाहेर पडावयाचें असेल, आपणांस जर कलेला लागलेलें ग्रहण सोडवावयाचें असेल, तर खरी थोर कला सतत प्रयत्नानें आपण निर्माण केली पाहिजे; जें खरें सुंदर आहे, खऱ्या कारणांमुळे सुंदर आहे, त्याचें कौतुक व पूजन करावयास आपण लागलें पाहिजे, शिकलें पाहिजे; परंतु आपण कौतुक तरी कसें करावयाचें, कशाचें करावयाचें ? ही जी आदरबुद्धि हृदयांत असते, तिला कसें वळण द्यावयाचें ? हें कळण्यासाठी मार्गदर्शक पाहिजे, वाटाड्या पाहिजे; तज्ज्ञ अधिकारी पुरुषाची *यासाठी आवश्यकता भासेल.* हॅवेलसाहेबांचें पुस्तक आपणांस मार्गदर्शन करील, आपणांस सूचना देईल, शिकवील. शिकलेल्या सुसंस्कृत कलाभ्यासी पुरुषाचें मन भारतीय चित्रकलेकडे कशा दृष्टीनें पाहील, प्राचीन भव्य कलेच्या नमुन्यांशीं अशा तज्ज्ञ व कलाशील मनुष्याचें मन कसें जोडलें जाईल, तें

या पुस्तकात वर्णिलें आहे. वर्तमान व भविष्य काळांतीलही उच्च कलेकडे तें मन कसें पाहील, याचें वर्णन या पुस्तकात आहे म्हणून हा ग्रंथ युरोपीय व भारतीय दोन्ही प्रकारच्या वाचकासही उपयुक्त वाटेल, परंतु भारतीयाना तर हा ग्रंथ अधिकच महत्त्वाचा आहे, अत्यंत महत्त्वाचा आहे कारण भारतीय मनाला उत्तेजन, उत्साह व स्फूर्ति हा ग्रंथ देईल, म्हणूनच तो आपणास अमोल आहे.

भारताची ध्येयें समजून घेऊनच भारतीय कला समजून घेता येईल, असें ग्रथकाराला वाटतें, तें बरोबर आहे भारताने ग्रीक लोकापासून कला उसनी घेतली, असा जो आरोप करण्यात येतो, असा जो सिद्धात माडला जातो, त्या बाबतींत हॅवेल म्हणतात की, ' भारताने स्वत चीं ध्येयें ग्रीक लोकापासून घेतली, असें कोणालाहि म्हणता येणार नाही यामुळे भारताने कला ग्रीकापासून घेतली की न घेतली, या प्रश्नाला महत्त्वच रहात नाही 'ग्रथकार म्हणतो,'' ज्या ज्या वेळेस कोणत्याही राष्ट्राला आपलीं थोर कलात्मक ध्येयें प्रकट करण्याची उत्कठा वाटते, त्या वेळेस स्वकीय की परकीय हें न पाहता – जीं साधनें जवळ असतील, ता घेऊन तद्द्वारा राष्ट्र आपलीं ध्येयें प्रकट करतें ज्याप्रमाणे ग्रीक लोकाना भारतीय तत्त्वज्ञान व भारतीय धर्म निर्माण करता आलीं नाही, त्याप्रमाणे भारतीय शिल्प व चित्रकला हीं-हि निर्माण करता आलीं नाहीत ग्रीक लोकाचीं कलाविषयक ध्येयें, कलाविषयक आदर्श भारतीय आदर्शांपासून भिन्न होतें व त्यानी आपले आदर्श भारतीय कलेवर कधी लादले नाहीत भारतीय कला ही महत्त्वाच्या बाबतींत अगदी स्वयभू व स्वतंत्र आहे भारतीय कला भारतीय कलात्मक हृदयाची, कलात्मक शक्तीची कन्या आहे भारतीय कला भारतीय हृदयाची मूर्ति आहे ''

हॅवेल साहेबाची ही विचारसरणी सुदर व सत्य आहे भारताने ग्रीक लोका पासून परकीयाजवळून कला उचलली, या आरोपाचें, या विधानाचें पदोपदीं खंडन हॅवेलसाहेबानी केले आहे भारतीय कलेंतील अभिजात पौर्वात्य पद्धत– शात, स्निग्ध भारतीय रीति–पुन पुन्हा ग्रंथकार दाखवून देतो जर ताजमहाल खरोखरच एका इटालियनाच्या मनातून निर्माण झाला असता, तर ही गोष्ट इतिहासांतील एक आश्चर्य म्हणून मानलें गेलें असतें ग्रीक लोकांच्या कलेपासून अत्यत विसदृश अशी जी भारतीय कला, तिला ग्रीक लोकानी जन्म दिला असें म्हणणे म्हणजे

पराकाष्ठेचा वस्तुविपर्यास आहे हा वदतो-व्याघात आहे. हॅवेलसाहेब यथार्थपणे म्हणतात की, खऱ्या तज्ज्ञांनी भारतीय कलाकडे अजून पाहिलेंच नाही अधिकारी व समर्थ युरोपीय टीकाकारांनी भारतीय कलेची उपेक्षाच केली व दुय्यम दर्जाच्या लोकांनी वाटेलतरी भरकटलें व तेंच सत्य म्हणून जग मानू लागलें! पुरावस्तु-संशोधनाचा किंवा वाङ्मयाचा अभ्यास करतां करता मध्ये सहज कलेकडे ढुंकून पाहणें, हा कलेचा अभ्यास नव्हे. ही थट्टा आहे कला-पूजा अशा देखल्या देवा दंडवताने होत नसते तें ध्येय झालें पाहिजे, कलेसाठी कलेचा अभ्यास केला पाहिजे तिची रीति, पद्धति असते, ती अवलोकिली पाहिजे भारतीय व ग्रीक चित्रकलेतील फरक जे जाणतात, विभिन्नता ओळखतात, त्यानाच दोन्ही देश परस्पराचे किती ऋणी आहेत, तें सागता येणें शक्य होईल

भारतवर्ष हमेशा युरोपपासून सारें उसने घेतो, त्याला स्वत चें असं कांहीं नाही, भारतवर्ष हा भिक्षेकरी आहे, भीक मागून समार साजरा करणारा, भीक मागून घर बाधणारा आहे, असे युरोपच मतच होऊन बसलें आहे हा असा पूर्वग्रह युरोपने जणु कायमचाच उराशीं बाळगला आहे, दृढमूल केला आहे. भारतीयाच्या स्वयभू अभिजात शक्तीचा व स्वाभिमानाचा हा खून आहे युरोपियनाची ही दृष्टि भारतीयास निरुत्साह करणारी, नाउमेद करणारी आहे, यात वाद नाही ज्याप्रमाणे मानवजातीचा लोढा पूर्वेकडून पश्चिमेकडे गेला, त्याप्रमाणे विचाराचा व कल्पनाचा प्रवाहहि सतत पूर्वेकडूनच पश्चिमेकडे गेलेला आहे काही प्रवाह तिकडून माघारे आले असतील, तिकडूनही येताना माल घेऊन कधी व्यापारी आले असतील, मुलाची वाढ आईबापच करतात, परंतु मुलाची पूर्ण वाढ झाली, म्हणजे मग मुलाचाही आईबापावर परिणाम होतोच, नाही असें नाही भारतीय कलेची उत्क्रांति होत असताना, भारतीय कलेचें विकसन होत असताना ग्रीक लोकांच्या सन्निकर्षाचा फार मोठा परिणाम झाला असेल. त्याची कल्पना करता येणें शक्य आहे खिस्त-शकापूर्वी चौथ्या शतकात असा संबंध होता, ही गोष्ट नि संशय आहे, परंतु हा सनिकर्ष किती दिवस राहिला व हा सनिकर्ष किती

तत्पूर्वी काही शतकें, ज्या वेळेस युरोपमधील प्राचीन पुरातन कला पुरी विकसित होऊन गेली होती, अशा वेळीं भारतात कलाविषयक कल्पनाचा मोठा प्रवाह पश्चिम आशियाकडून येत होता. या प्रवाहाला भारत ओढून घेत होता हे कलाप्रवाह मुळात फार जुने, बाबिलोन व असीरिया या संस्कृतींतील होते परंतु ग्रीक व रोम येथे हे प्रवाह जाऊन तेथील रंगाने रंगून पुन्हा परत येत होते व तेच भारताकडे आले जुन्या राष्ट्रांतील कथा व आख्यायिका होयाच. त्यात हे विद्युत्-प्रवाह मिसळले आणि भारतीयांच्या धार्मिक हृदयाने, बुद्धीने एक नवीनच कला निर्माण केली भारतीय व पाश्चिमात्य यांचा तो रमणीय मिलाफ होता. तें कलम होतें. ही भारतीय कला स्वतः च मग विशाल व श्रीमंत झाली, वैभववंत व रूपवंत झाली व तिचे प्रवाह–मोठे प्रवाह–चारी दिशांस गेले ”

खिस्तशकाच्या प्रारंभाच्या काळात, या भारतीय उगमापासून चिनी लोकां-च्या चित्रकलेला स्फूर्ति मिळाली सातव्या शतकापासून तेराव्या शतकापर्यंत चिनी चित्रकला साऱ्या अलम् दुनियेत पहिल्या नंबरची होती, अद्वितीय होती लुटारू टोळ्या पुन पुन्हा हिंदुस्थानात जात होत्या सर्व देशातून हिंडत होत्या अस्तंगत होणाऱ्या रोमन साम्राज्यावर गिधाडाप्रमाणे तुटून पडणाऱ्या या टोळ्या– यानी पूर्व व पश्चिम यांच्यामधले रस्ते गजबजलेले राखले व भारतातून चीनमध्ये गेलेल्या कलेच्या प्रवाहांतील भाग पश्चिमेकडे पुन्हा नेला बायझान्टाइन कलेवर भारतीय कलेचा परिणाम दिसतो, एवढेंच नाही तर मध्ययुगातील गॉथिक पद्धती-च्या चर्चावरही तो परिणाम झालेला दिसून येतो आशियातील संस्कृतीवर युरोपियन कला व संस्कृति यांचा फार परिणाम झाला आहे, असें युरोपियनाला वाटतें, परंतु युरोपचा आशियावर परिणाम झाला, त्यापेक्षा कितीतरी पटीनें अधिक परिणाम आशियातील विचाराचा, धर्माचा व संस्कृतीचा युरोपियन कला व सभ्यता यावर झालेला आहे, परतु याचा यथार्थ गौरव कोणी करील तर शपथ !

भारताच्या पूर्व व पश्चिम किनाऱ्यावर अनेक उत्कृष्ट बंदरें होती या बंदरातून या काळात वसाहतवाल्यांच्या, धर्मप्रसारकांच्या, कलावानांच्या टोळ्याच्या टोळ्या आशियाच्या दक्षिण भागात, सिलोन, सयाम, कांबोज, बलि, जावा वगैरे प्रांतात गेल्या सहाव्या शतकांत चीन व कोरिया यांच्याद्वारा भारतीय कला जपानमध्येही गेली इ० स० ६०३ मध्ये भारतातील, गुजराथमधील वसाहत-

वाल्यांनी भारतीय कला जावामध्ये नेली व आठव्या आणि नवव्या शतकात बोरोबुडूर येथे भारतीय शिल्पाने चमत्कार करून दाखवले. युरोपियन लोकांची कलापरीक्षक व कलापरामर्षक दृष्टि संकुचितपणा सोडून जेव्हा विशाल होईल, ग्रीक व रोमन लोकांच्या कलाविषयक कल्पना व प्रमाणें याची मोजपट्टी हातांत घेऊन, विश्वाशी व अनंताशी विश्रब्ध गोष्टी करणाऱ्या आशियांतील कलाना मोजावयास जाण्याचा पोरकटपणा व खुळेपणा सोडून देईल, ज्या दिवशीं युरोपियन कलाचिकित्सेचा हा मोक्षदिन उजाडेल, त्या दिवशीं युरोप जावा व बालि बेटातील बोरोबुडुर येथील शिल्पकला निर्माण करणाऱ्या त्या अज्ञात शिल्पकारांना जगातील अत्यंत नामांकित व परमोच्च कलावंतात आदराचें व सन्मानाचें स्थान देईल.

भारतावर ग्रीक लोकांचा जो प्रत्यक्ष परिणाम झाला, त्याला हॅवेलसाहेबानी नाही म्हटलें नाही तो स्पष्टपणे त्यानी दाखवून दिला आहे, परंतु ग्रीक लोकांचा परिणाम, त्यांच्या कलेचा परिणाम जास्तीत जास्त झाला, असें गृहीत धरलें, तरी पुढे भारतीय कला जी चमकली, पुढच्या काळात भारतीय कलेचा जो विकास दिसतो, त्याला काय कारण ? त्या वेळेस ग्रीक लोकांचा सन्निकर्ष नव्हता आपणास एकच सिद्धांत मांडता येतो की, भारतात जिवंत अशी, जोरदार, बलवान् अशी कला अस्तित्वात होती. महान् नदी इतर प्रवाहास आत्मसात् करून घेऊन ज्याप्रमाणे वाढत गभीर होत पुढे जाते, त्याप्रमाणे जोरदार स्वयंस्फूर्त भारतीय कलेच्या प्रवाहात परकीय वर्चस्वाचे परिणाम स्वतात मिसळून घेण्याची शक्ति होती, त्या परकी परिणामास स्वतःमध्ये मिसळवून टाकण्याची तिच्यात शक्ति होती एक गोष्ट सदैव ध्यानात धरली पाहिजे, ती ही की, आपणामध्ये जर खरीखुरी कला निर्माण करण्याची स्वयंभू प्रतिभा व शक्ति नसेल, तर जगातील सर्व कलात्मक विद्यापीठाचा जरी आपणावर परिणाम घडवला, तरी आपण खरे कला–निर्माते होणार नाही ता विद्यापीठें आपणांस कला–स्रष्टे करू शकणार नाहीत जिवंत असा मूळचाच अंकुर पाहिजे बाहेरच्या परिणामाने आपण अनुकरण करणारे, दोनचार आकार करणारे फारतर होऊं, खऱ्या निर्मितीची अनुकृति करू भारताचा प्राचीन युरोपशीं संबंध येण्यापूर्वी येथे शिल्प किती उत्तम व उच्च होतें, याची साक्ष कलकत्ता म्यूझियममधील भारहूत येथील शिल्पनमुने पटवून देतील हे शिल्पकलेचे नमुने ख्रिस्तशकापूर्वी साधारण १५० च्या सुमारचे असावे.

या नमुन्यांमध्ये ग्रीक परिणाम दिसून येतो, असें म्हणण्याची कोणाचीही छाती अजून झाली नाही. ज्या हातांनी असलीं अमर कामें, विशाल कामें करावयाचें अंगिकारलें, असें धाडस व साहस केलें, त्या हातांनी प्रथम लाकूड, माती असल्या नष्ट होणाऱ्या वस्तूंत शिक्षण घेतलें असलें पाहिजे. परकीय वर्चस्वाच्या कलात्मक परिणामांच्या कितीही थाता मारा, कलेच्या इतिहासांत एक महत्त्वाचा प्रश्न आहे, तो हा की– झाला असेल परकीय परिणाम– परंतु तो आत्मसात् करण्याची शक्ति स्थानिक कलेमध्ये होती की नाही ? भारताच्या बाबतींत हॅवेलसाहेबांनी या ग्रंथांत उत्तर दिलें आहे. त्यांचा हा सारा ग्रंथ या प्रश्नाला उत्तर देत आहे.

आपल्या ग्रंथकाराने दुसरा एक घेतलेला मुद्दा फार महत्त्वाचा, नाजूक व सूक्ष्म आहे. भारताचें कलाप्रांतात स्थानच नाही, या कल्पनेचा धुव्वा उडवतां उडवतां, भारतीय कलांच्या ध्येयाचें समर्थन ग्रंथकार करीत आहे. बाह्य आकार कसा रेखाटला जातो, बाह्य सौंदर्य कसें दाखवलें जातें, यावरनच युरोपियन शिल्प-शास्त्राची स्तुति केली जाते. शारीरिक पूर्णता म्हणजे सौंदर्याचा आरंभ होय. प्रमाणबद्ध शरीर, शारीरिक शास्त्रदृष्ट्या निर्दोष असें आकारदर्शन म्हणजे सौंदर्या-चें प्रकटीकरण, असें युरोपमध्ये मानतात. " सर्व ललितकलांचें ध्येय निसर्गाचें अनुकरण करणें हें होय. " युरोपमध्ये हें वाक्य ध्येयभूत व प्रमाणभूत मानलें तरी युरोपियन कलांचें नीट समर्थन होणार नाही. या वाक्याने युरोपियन कलांची नीट परीक्षा केली, असें होणार नाही. ऑलिंपस येथील ज्यूस– मायकेल एंजेलोने खोदलेले मोझेस–या प्रतिमा निसर्गाचें अनुकरण करणाऱ्या नाहीत. त्यांच्या अंत-रंगातून ते आकार बाहेर पडले आहेत. युरोपीय कलेंतही " कला ही निसर्गाची नक्कल आहे, " या गोष्टीला विरोधी असे भाव आहेत; परंतु एकंदरींत युरोपमध्ये कलेचें हें सर्वमान्य ध्येय म्हणून निर्विवाद मानलें जातें. आज तरी मानलें जात आहे व युरोपियन कलेचें हेंच स्वरूप रविवर्मा व त्याचे अनुयायी यांनी उचललें आहे.

हॅवेल निर्भयपणें असा सिद्धांत मांडतात की, भारतीय शिल्प व कला यांचें आरंभापासूनचें ध्येय युरोपियन ध्येयाहून अत्यंत भिन्न होतें. भारतीय कलावंत शारीरिक आकार, सृष्टींतील आकार, निसर्गकृत आकार निर्माण करण्यात, हुबेहुब निर्माण करण्यांत सौंदर्य आहे, असें मानीत नाहीत; या आकार–अनुकृतींत तें सौंदर्य

संशोधन करीत नाहीत तर बाह्य, स्थूल, शारीरिक, आकारमय अशा सौंदर्याहून अधिक सूक्ष्म व रमणीय असें सोंदर्य सुचवण्यात, या प्रयत्नात कलेचें खरें रहस्य आहे, असें ते मानतात. भावबोधन हा कलेचा प्राण होय अपार्थिव असें दिव्य सोंदर्यसूचन हें कलेचें काम होय, असें भारतीय कलेचें मत आहे, असें हॅवेल म्हणतात. भारतीय कलावान् देवताच्या चित्रात बारीकसारीक शारीरिक रचना दाखवीत बसत नाही त्या तो दावून टाकतो, असें करुन अत्यंत साध्या रंगात काम करता येईल, असें तो करतो हें पाहून युरोपियन तज्ज्ञ म्हणतो की, " हिंदी कलावंताला शारीर शास्त्र माहीत नाही, कोणते शारीरिक अवयव कसे असतात, कसे प्रमाणवद्ध असतात, तें माहीत नाही व म्हणून कलेच्या उच्च प्रांतात हिंदी कलावंताला निसर्गाचें अनुकरण करण्याची शक्ति नाही " परंतु तो भारतीय कलावान् असा गूढ व उच्च आकार निर्माण करतो, अशी अभिनव सुंदर आकृति निर्माण करतो व त्या मूर्तिनिर्मितीने असें आध्यात्मिक सौंदर्य सुचवून देतो की, जें सोंदर्य सासारिक वैषयिक वासना दावल्यानेच, सासारिक आपत्ति संन्यासिल्यानेच मिळूं शकेल भारतीय तत्त्वज्ञानाचीं ध्येयें भारतीय कलेला मूर्तिमंत करावयाचीं आहेत कलेलाहि आध्यात्मिक आतरिक सोंदर्य प्रकट-करावयाचें आहे

ग्रंथकाराने या मुद्द्याचा विस्तृत ऊहापोह केला आहे. भारतीय आध्यात्मिकतेचें ध्येय सयमी पुरुप हें आहे, या आध्यात्मिक संयत पुरुषाची प्रतिमा कलेंत प्रकट झाली पाहिजे शरिराचा वरचा भाग सिंहाकार असावा, असें म्हणूनच मानतात बत्तीस शिवलक्षणात, शुभ लक्षणात हें चिन्ह आहे, त्यातून हेंच सुचवलेलें आहे

हिंदी सिंहाची छाती विशाल, खादे रुंद असे असतात, त्याचा नितंबभाग बारीक असतो सिंहाची कटी प्रसिद्धच आहे हिंदी शिल्पकारानी ज्ञानी बुद्धाला असेंच देहसौष्ठव दिलें. पुरुपसिंह बुद्ध सिंहाप्रमाणे चितारला गेला, रंगवला गेला विशाल खादे, रुद छाती, सोनेरी रंग, मृदु कातडी, असे बुद्धदेव सिंहासारखे बलवान् व चपळ दिसत, तेजस्वी दिसत.

भारतीय चित्रकलेला, शिल्पकलेला कोठून स्फूर्ति मिळाली? भारतीय

कलांची थोर व उदात्त ध्येयें कोणतीं होतीं ? हें सारें मोठ्या सहृदयतेनें व विवेचकपणें हॅवेलनें वर्णन केलें आहे व भारतीय टीकाप्रांतात बहुमोल भर घातली आहे.

या अपूर्व ग्रंथांत चित्रेंही नाना प्रकारचीं व नाना विषयाचीं दिलीं आहेत. या बाबतींत या ग्रंथाला तुलनाच नाही. भारत हा असा देश आहे की, या देशानें स्वत:साठीं काय केलें व काय ठेवलें, यावरूनच त्याचा मोठेपणा अजमावयाचा नसून, इतर देशासाठीं काय केलें, त्यावरून तो जास्त चांगल्या रीतीनें समजून येईल. भारतानें काय केलें, काय मिळवलें याची नि संशय, निरपवाद कल्पना भारताच्या संस्कृतीपासून ज्याच्या संस्कृति निर्माण झाल्या, त्या संस्कृतींवरून करून येईल. आपल्या ग्रंथकारानें याहि गोष्टींचा नीट ऊहापोह केलेला आहे. तिबेट, नेपाळ, सीलोन, जावा वगैरे ठिकाणच्या संस्कृति भारताच्या कन्या आहेत व या मुलांमुलींच्या संस्कृतीवरूनही भारतमातेचें वैभव कळून येईल. आपल्या मुलींना माहेरचें भरपूर वैभवभांडार तिनें दिलें आहे हॅवेलचें पुस्तक वाचणाऱ्यांना जावा बेटांतील वसाहतींची प्रथमच माहिती मिळेल, बोरोबुदूर येथील शिल्पाची व तेथील महा मंदिरांची माहिती वाचून अनेकांना आश्चर्य व अभिमान वाटेल. गांधार देशांतील अर्धवट ग्रीक शिल्पकला व खरी भारतीय शिल्पकला याची तुलना करून या दोहोंतील अफाट फरक जर समजावून घ्यावयाचा असेल, तर बोरोबुदूर येथें उपदेश करणाऱ्या बुद्धाचा अवशेष आहे तो, व गांधारमधील त्याच तऱ्हेचा बुद्धाचा जो पुतळा, त्याची तुलना करून पहावी हॅवेलनें म्हटलें आहे व तें यथार्थ आहे की, गांधाररीति भारतीय ध्येयाचें अनुसरण करीत नव्हती; कलकत्ता म्यूझियममध्ये गांधाररीतीचीं शिल्पकामें आहेत, तीं पहावीं, म्हणजे भारतीय संन्यासी व यति लष्करांतील चपळ अंमलदारासारखे कोरलेले दिसून येतील. त्याच्या मिशा अगदी उत्कृष्ट केशशृंगार करणाऱ्याकडून जणु नीट करून घेतल्या आहेत, असें दिसेल व ही भारतीय कला नाही, असें लगेच पाहणारा म्हणेल. मगध देशांतील शांत, धीरगंभीर, साधे परंतु दिव्य असे बुद्ध, त्याची सर या गांधार-नमुन्यांला येणार नाही ! किंवा बोरोबुदूर येथील ध्यानमय बुद्धमूर्ति—तिच्यांतीलहि मधुरता व सौजन्य, ती अकृत्रिम रमणीयता गांधार-शिल्पांत नाही. पुढच्या पिढीला जीं ध्येयें जन्मत:च मिळतात, जगांतील पहिल्या श्वासोच्छ्वासाबरोबर, आईच्या दुधाबरोबरच जीं मिळतात, तीं किती हळहळू तयार होत

आलेली असतात, शतकानुशतकें तीं ध्येयें कशीं वाढत असतात, अनेकांचे अज्ञात श्रम त्याला कसे खरोखर कारणीभूत होत असतात बरें ! हॅवेल म्हणतो "युरोपियन कलेचे जणु पंख तोडलेले आहेत. या पार्थिव जगातील सौंदर्याचीच फक्त तिला ओळख आहे. मर्त्य लोकींच्याच सौंदर्याशीं युरोपियन कलेचा परिचय आहे. दाट परिचय आहे; परंतु भारतीय कला अनंत अंबरांत उड्डाण घेते, स्वर्गांत विहार करावयास जाते व वरील स्वर्गीय वस्तूंचें, दिव्य सृष्टीचें सौंदर्य या धरातलावर आणण्याची, अमर्त्य लोकींचें लावण्य मर्त्यलोकीं आणण्याची सतत खटपट करते. पृथ्वीवर स्वर्ग निर्माण करण्याचा भारतीय कलेचा अविरत व अखंड प्रयत्न चाललेला आहे.



## निबंध ४ था :

# ताजमहालचें स्वप्न पाहणारा शहाजहान

अजून पश्चिमेकडच्या मावळणाऱ्या सूर्याचे शेवटचे किरण आकाशांत घुटमळत होते. नवचंद्र वर आकाशांत ढगांच्या आड सूर्यकिरण जाण्याची जणु वाट पहात होता व हळूच ढगांपाठीमागून डोकावून पहात होता व पुन्हा मागे लपत होता. बादशहा शहाजहान एकटाच घोड्यावर बसून नदीतीरावर प्रार्थना करावयास गेला आहे– जात आहे. एकजीव झालेले दोन जीव– त्यांचा वियोग होऊन कांही आठवडे, कांही महिने लोटले असावेत. त्या भयंकर व दारुण विरह–क्षणाला, वियोगक्षणाला कांही महिने झाले असावेत; परंतु हा चिरवियोगही चिर नव्हता– पुन्हा मीलन होणार होतें– केव्हातरी होईल. जखम अजून ताजी होती. हृदय वेदनेने कापत होतें, थरथरत होतें. तरीही गंभीरता व शांति यांची उषा हृदयाकाशांत येऊं पहात होती; शोकनिशा जाऊं पहात होती. अंतरात्म्याचे गाभाऱ्यांत शांति व वेदना यांचें मीलन–स्थळ होतें. शांति व दुःख परस्परांस भेटत होतीं. पलीकडे तेथे नदीच्या त्या दूर तीरावर तिची कबर आहे. वाहणारी यमुना! ल्हानशी ती कबर– ती समाधि! आज रात्रीं हा हृदयाचा तंतु किती गार गार वाटतो आहे. थोड्या वेळानें, चंद्र मावळला म्हणजे, जग निद्रादेवीच्या कुशींत गेलें म्हणजे, शहाजहान नदीपलीकडे घोड्यावरून जाईल, नंतर तेथे उतरेल; त्या संगमरवरी आरसपानी समाधीसमोर गुडघे टेकील, तिचें चुंबन घेईल; प्रेममत्त

होऊन, भावनोत्कट होऊन थरथरत मुके घेईल, चुंबनें घेईल, ते थंडगार दगड, ती स्तब्ध व शांत मुकी माती, तिचें तो चुंबन घेईल. ते दगड व ती माती प्रेम करणाऱ्या त्या पागलाला तिचे पदरच वाटत आहेत, तिच्या अंगावरच्या वस्त्राचे ते काठच त्याला वाटत आहेत ! काही वेळाने मग त्याच्या हृदयात घोर निराशा येईल, मीलनाची तळमळ व उत्सुकता वाढेल, परंतु आता तो प्रार्थना करीत आहे कर, पागला, प्रार्थना कर मुसलमानी मोंगल बादशहाला साजेल अशा रुबाबाने, ऐटीने व गंभीरतेने घोड्यावर स्वार होऊन तो पुन्हा येरझाऱ्या घालीत आहे. त्याने मान खाली घातली आहे अवनत-शिर असा आहे तो बादशहा घोड्याच्या पाठीवर आहे. हात- लगाम धरणारे हात- लगामावरच शांत आहेत, स्थिर आहेत बादशहा विचारात रंगून गेला आहे ध्यानांत मग्न झाला आहे त्याच्या धार्मिक श्रद्धेचा-बलवान् धार्मिक श्रद्धेचा- अमृतमय स्पर्श त्याच्या हृदयाला होत आहे, त्यान्या जीवनात ती श्रद्धा येत आहे, बोलत आहे तो आता बादशहा नाही तो इन्सान आहे, माणूस आहे, मानव आहे त्या शुभ समाधीची चमक त्याच्याजवळ चिर शांतीच्या गोष्टी बोलते या मृत्युमंदिराने- ती जी सोडून गेली- तिला दुःखपंकातून उद्धरलें, वर काढलें ! मयुरासनाने तिला अशाप्रमाणे उद्धरली नसती, मुक्त केली नसती- या मर्त्यभूमीत किती त्रास, किती यातना ! किती झगडे, हाणामाऱ्या, स्पर्धा, मोहद्वेष, मत्सर ! या जगात घटकेचा, पळाचा विश्वास नाही, काळाच्या हातातील बाहुलीं सारीं ! अशा या जगातून ती दूर गेली. या शोकमय, अस्थिर, चंचल संसारातून दूर दूर गेली अनंततेमधून जो जीव त्याच्याकडे आला होता, जो आत्महंस, तो थोर धवल हंस, आपल्या पंखांवर प्रेम, अनुकंपा घेऊन आला होता, तो पक्षी पुन्हा परमेश्वराच्या घरीं गेला. देवाने त्याला बोलावलें ती माती, तें मृत्तिकादर्शन म्हणजे खरोखर संभाषण होतें ती मुकी भाषा होती घरातील दिवा मालवला गेला, परंतु त्या समाधीजवळ अधिकच सुंदर व स्थिर दिवा तेवत नव्हता का ? ती समाधि होती जणु यज्ञभूमि ती होती, वेदी होती तें मंदिर होतें देवतेचें मंदिर होतें पत्नी, माता, राणी गेली. हीं नाती तुटलीं; परंतु स्वर्गांत प्रभूसमोर एक साध्वी, एक सती उभी आहे, आपल्या भूमीवरील प्रियकरासाठी ती प्रार्थना करीत आहे

× × ×

## शहाजहानचा अंत.

कांहीं व्यक्तींच्या जीवनांत जणु एक प्रकारचें नाटक चाललेलें असतें– जणु खरोखरचें उत्कृष्ट नाटक तेथें पहावयास सापडतें. एका जन्मांत अनेक जन्मांचें फल जणु ते मिळवीत असतात. रत्न आणि त्याचें तोरण– त्यांच्या जीवनांत सारें सुंदरच दिसतें. एक प्रकारची एकता दिसते– एक प्रकारचें संगीत दिसतें. मेळ दिसतो. शहाजहानच्या जीवनांत तर हें विशेषच प्रामुख्यानें दिसून येतें. आडदाड चंडखोर शिपाईगडी दिल्लीपति होतो, दिल्लीचा बादशहा होतो– सम्राट् होतो. यशस्वी, विजयी सेनानी, लोकोत्तर राज्य चालवणारा, अत्यंत संपन्न राजा; परंतु दुसरींही सुखें– सुंदर व सूक्ष्म सुखें– दुसरेंही सहृदय आनंद त्याला लाभले होते, जे पुष्कळ वेळा बादशहांच्या वाट्यास न येतां गरिबांच्याच वाट्यास येतात. अखिल भारताचा सम्राट्, अलम् हिंदुस्थानचा बादशहा– परंतु जगांतील अत्यंत थोर व मधुर, उदात्त व रमणीय अशा प्रेमकाव्यांतील तो नायक आहे! त्यानें तिला सारें दिलें– सारें दिलें व तिनें त्याला सदैव निर्मळ भक्ति दिली, सेवा-मधुर प्रेम दिलें. पतीचेंच सारें तीं घेऊन बसली नाहीं. पतीलाहि ती सदैव देत राहिली. तो तिला देत होता व ती त्याला प्रत्यर्पित होती; परंतु जें दिलें, तें कांहींच नाहीं, असें त्याला वाटलें. प्रियेच्या चरणावर, तिच्या स्मृतीवर अमर असें गीतपुष्पही त्यानें अर्पण केलें. हें दिव्य गीत अर्पण करण्याची– ही दुर्मिळ सहृदय देणगी त्या स्मृतीवर अर्पण करण्याचेंही त्याचें भाग्य होतें! जीं शहरें, जे प्रासाद, जे मनोरे त्यानें बांधले– ते सारे तिच्या स्मृतीला अर्पण केले नव्हते का? त्यानें तीं दिव्य शिल्पकलेचीं कामें स्वतःच्या पत्नीला व भारतमातेला अर्पण केलीं आहेत. हीं शिल्पकर्में– बादशहाच्या ओठांनीं जणु गाइलेलीं गीतेंच– त्या स्वच्छ, सुंदर, संगमरवरी पाषाणांत नाहीं का प्रकट झालेलीं? जगांतील कोणाही सम्राटानें अशा प्रकारचीं अप्रतिम शिल्पकामें उठवलीं नाहींत; जगांतील कोणाही राजाचें इतकें प्रेम व इतकी भक्ति स्वतःच्या राज्याबद्दल दिसून आली नाहीं. ज्या भूमीवर शहाजहान राज्य करीत होता, त्या भूमीबद्दल किती वेड त्याला! किती प्रेम! तिला किती नटवूं, सजवूं, भूषवूं, असें जणु त्याला वाटत होतें!

महान् जीवनाला परिपूर्णता यावी, तें स्वर्गांगसुंदर दिसावें, म्हणून तेथें सदैव दिमाख, झगझगाट, भाग्य, वैभव, यशश्री, हींच फक्त असून चालणार नाहीं.

सारखा प्रकाशच राहिला तर कंटाळा वाटेल ! अनंत तारांनी चमचमणारी शांत अंधारमय भगवती निशाही पाहिजे. महान् संगीतात अल्प खिन्नता ही मिसळलेली असेल, तरच तें संगीत हृदय हलवतें. बादशहाच्या आनंदमय वैवाहिक जीवनानंतर दीर्घ विधुरता आली. रमणीय सुखभोगानंतर रमणीय विरहदुःख आलें. वैभवशाली साम्राज्य भोगल्यानंतर सात वर्षांचा कारागृहवास भोगावयास मिळाला. ज्यांच्या-समोर अख्खी दुनिया मान लववीत होती, शिर झुकवीत होती, कुर्निसात करीत होती, त्याला शेवटीं स्वतःच्या फक्त एका मुलीची प्रेमपूर्ण भक्ति, मधुर भक्ति, मिळालेली पाहून कृतार्थता वाटली. त्याला अभिमान वाटला. आपल्या मुलीची गोड श्रद्धा पाहून, निर्मळ प्रीति पाहून त्याला परमानंद झाला. तुरुंगाची खोली, ती कोठडी ! पूर्वीच्या स्मृति कोणत्या प्रकारच्या– व तें तुरुंगातील घरटें कोणीकडे ? आपल्या जीवनाचीं तीं शेवटचीं सात वर्षे ज्या अंधारात शहाजहानने काढलीं, त्या अंधारात कोणत्या स्मृति व कोणत्या आशा त्याच्या हृदयसागरावर उठत असतील बरें ?

त्याचा अंत असा—

आग्रा येथील किल्ल्यांत अजूनहि ही हकीगत सांगितली जाते. शहाजहानने अत्यंत विनवणी केल्यावरून चमेली–महालाच्या पाठीमागच्या गच्चीत त्याचा बिछाना नेण्यात आला. खाली काळीभोर यमुना वहात होती. पित्याच्या चरणाशीं पितृनिष्ठ जहान आरा रडत होती. तेथे जवळ कोणी नाही, आता फक्त पिता व पुत्री. बाकी सारी निघून गेलीं. त्या थोर वैद्यांची, वैद्याची आता कोणतीही सेवा करावयाची शिल्लक राहिली नव्हती. गालिच्याच्या कडेला जोडा काढून ठेवलेला आहे व बादशाही शिरस्त्राण काढलेलें आहे. आता हें शेवटचेंच काढणें, कारण जगातील वस्तूंचे उपयोग अतःपर संपले. या जगातील वस्तूंचा उपयोग शहा-जहान आता करणार नाही. शांत, निःस्तब्ध रात्र, खिन्न दडलेला चांद; धावणाऱ्या-पळणाऱ्या मेघाच्या बुरख्यांत तो आपणांस अर्धवट लपवित होता. त्या मेघांची अर्धवट ओढणी चंद्राने घेतली होती. त्या मृदु, स्निग्ध व सौम्य राजकन्येचा हृदय-चंद्र मेघाच्छादित असे; तेथेही शांति आहे, रात्र आहे.

परंतु शहाजहानचें हृदय कसें आहे ! त्याला काय वाटतें, त्याचे मन -

स्थिति कशी आहे ! त्याला तो क्षण परम सुखाचा वाटत आहे. तो क्षण दिव्य अपेक्षापूर्तीचा आनंद त्याला देत आहे. त्या बुरुजाखाली यमुनेचा आवाज होत आहे. जणु ती गाजीत आहे. त्या बुरुजाना, पाषाण-बाळांना ती पाजीत आहे; ते बुरुज यमुनामाईचें दूध पीत आहेत. ही नदी, ही यमुनानदी दुसऱ्या एका नदीची कल्पना त्याच्या हृदयांत उत्पन्न करीत आहे. या संसाराची नदी-ही भवयमुना-भवभागीरथी-भवसिंधु ! या नदीच्या पैलतीरावर तो आता उभा आहे. यमुनेच्या पैलतीरावर तिची समाधि होती त्या पैलतीरावर ती असेल त्या वळणाच्या पलीकडे धवल वस्त्र च गुंठित दिव्य दर्शन त्याला होत होतें. ताज दिसत होता. तिचा ताज, तिचा मुकुट, किरीट, जो त्याने तिच्यासाठी घडवला, तो आज तेथे उभा होता; परंतु आज रात्री तो ताज केवळ मुकुटच नाही-मुकुटाहून अधिक आहे. तो ताज मुकुट नसून, मुकुटधारी तिची मूर्तीच आहे जणु. ती मूर्तीच तेथे उभी होती. आज रात्री ती तेथे उभी आहे- आपल्या पूर्वीच्या सर्व सौभाग्याने, वैभवाने सजून उभी आहे; शृंगार करून मधुरतेने उभी आहे, परंतु या शृंगार-साजांत, या पूर्वीच्या मधुरतेने आता पावित्र्य ओतलेलें आहे. त्या कोमल व मृदु-मधु यमुनेच्या तरंग नादापलीकडे-त्या भव्य आकृतींतील प्रत्येक रेघान् रेघ, कोमलता, शांति, सर्वव्यापी पावित्र्य दाखवीत आहे. कोमल, शांत व पवित्र असा आत्मा-अशी मूर्ति-यात्रेकरूसाठी तेथे वाट पहात उभी आहे. दमला-भागलेला यात्रेकरू, पाय थकलेले, पाठ लवलेली-वाकलेली, शिर किती खाली नमलेलें, लोंबलेलें ! अरेरे- यात्रेकरू जात आहे ! महाल व तुरुंग, राजगृहें व कारागृहें, रणांगण व प्रार्थनेची सुरंगांतील खोली, सारें सोडून हा जीर्णविशीर्ण यात्रेकरू निघाला होता. मृत्यूच्या पैलतीरावर-शांत पैलतीरावर उतरण्यासाठी जात होता व उतरून घेण्यासाठी तेथे पवित्र आत्मा उभा होता.

खरोखरच दिव्य अंत-शहाजहानचा थोर मृत्यु- महाप्रयाण ! ललना-हृदयातील राजा-हें त्याचें खरें राजपद-सर्व जगाला ललामभूत होणारा ताज-किरीट-जिला त्याने घातला, तिच्या हृदयात त्याला किरीट मिळाला, हाच त्याचा खरा मुकुट-त्या दिव्य क्षणीं तो मुकुट त्याला मिळत होता !

---

## निबंध ५ वा :

# सती

हें सतीचें चित्र जर एखाद्या युरोपियन चित्रकाराने काढलें तर आपणांला किती निराळें दिसलें असतें ? एक सुंदर दिसणारी स्त्री, पुरेपूर उंच उभी, सौंदर्य व विजय यांच्या संमिश्र छटा जिच्या मुखावर उमटलेल्या आहेत व अशा विजयी मुद्रेने जी सभोवती जमलेल्या लोकांच्या समूहाकडे पहात आहे– असें चित्र त्याने काढलें असतें; परंतु नंदलाल बोस यांनी काढलेलें चित्र किती निराळें! भारतीय भावना वरील भावनापेक्षा किती विभिन्न व निराळ्या ! नंदलाल बोस यांची भावना–दर्शनाची रीति किती सुंदर व आकर्षक आहे! या चित्रात एक स्त्री उभी आहे ती सुंदर आहेच नववधूप्रमाणे तिने शृंगार केला आहे; त्या निजप्रक्षणावर तिचें सारें हृदय, तिचा सारा जीव जडला आहे तो क्षण -मीलनक्षण--अमिदिव्या-चा क्षण– परंतु आपल्या या दिव्य कीर्तीची, या थोर पराक्रमाची, यशाची तिला जाणीवही नाही ! तो आकार केवळ सत्त्वगुणी आहे त्या चर्येवर, त्या ध्यानात, त्या ठेवणीत रजोगुणाचा लवलेशही नाही, ज्वाला शिरेप्रमाणे–कळसा-प्रमाणे वर उसळत आहेत चितेवर तिने गुडघे टेकले आहेत मुखावर भीतीचा लेशही नाही तिच्या प्रार्थनेत निरोप घेताना निघालेला अश्रु मिसळलेला नाही. तिचे डोळे – *तिच्या डोळ्याना त्या पवित्र आकाराशिवाय, ज्याला आता ती* लवकरच भेटेल, त्याच्या पुण्य मूर्तीशिवाय– तिच्या डोळ्याना अन्य कांही दिसत

नाही खालून चाटोत वर येणाऱ्या ज्वाळा, जगात ज्यांना ऱ्यांना मागे सोडून ती जात होती ती प्रिय मंडळी– कोणाचेंहि तिला स्मरण नव्हतें. कोणीहि दृष्टी-समोर तिला दिसत नव्हते मन निश्चल आहे, शांत आहे, शांतिसिंधु हृदयात उचंबळला आहे. तो ऐक्याचा क्षण आहे. कोणाचा वियोग होत आहे, ही कल्पना-ही तिच्या हृदयात नाही

ही निस्सीम निर्भयता, हा अहंचा पूर्ण अभाव, स्वत च्या जाणिवेची शून्यता! भारतियांची स्त्रीजातीच्या थोरवीची, दिव्य यशाची केवढी कल्पना! या सतीच्या चित्रात त्या कल्पनेची साक्ष पटते इतर देशांतून जो त्याग थोर ध्येयासाठी, धर्मासाठी, स्वातंत्र्यासाठी, ज्ञानासाठी करण्यात आला, जे आत्महवि समर्पण अशा थोर ध्येयपूजेसाठी करण्यात आले ते आत्मसमर्पण घरच्या मधुर व मनोहर, सुकुमार व कोमल प्रेमासाठी करण्यात आलें! अनेकदा– हजारों वेळा करण्यात आलें! हा त्याग करणें, हें दिव्य सती जाणे, प्रथा झाली! ज्या स्त्रियांनी हा यज्ञ केला, त्या स्त्रिया सदैव त्याच्या वंशजाकडून पूजिल्या जावोत! अशाच पूजिल्या जावोत, वंदिल्या जावोत! ज्या जातींत अशी रत्नें, अशा निर्मळ मोती, अशा दिव्य तारा होऊन गेल्या, त्या जातींतून धैर्य मरणार नाही, निष्ठा मरणार नाही, यात संशयच नको तें धैर्य, ती निष्ठा आज लपून राहिलीं आहेत, सुप्त आहेत, या सतीच्या रुपाने आता तें धैर्य पुन्हा नाही का प्रकट होणार ? परतु नवीन रुपाने तें प्रकट होईल, भविष्यकाळात जगाला हलवणाऱ्या ज्या क्रांति होतील, त्यात हें स्त्रियांचें धैर्य प्रकटेल ही निष्ठा पुन्हा तळपेल भारतातील तीं जुनीं घरें– त्या घरात सदैव सेवा करणारी हिंदु-नारी– घरात योगिनीप्रमाणे राहणारी ती स्त्री– व शेवटीं अग्निज्वाळात आत्मार्पण करणारी ती सती– हा सर्व मार्ग– हा घरापासून स्मशानापर्यंतचा, जीवनापासून मरणाला कवटाळण्यापर्यंतचा दिव्य पंथ– हा यात्रामार्ग– केवळ निर्मय, निर्दोष यशाचा– दिव्यतेचा नाही का ? या मार्गावरील प्रत्येक पाऊल पाहूनच आपणास लोटांगण घालावयास नको का !' ती धुळी माथा धरावयास नको का ?



# वेदाच्या संहिता

वेदाच्या चार संहिताच्या क्मिती पुढीलप्रमाणे आहेत–

| वेद | किंमत | ट० खर्च | रेल्वेपार्सलने | परदेशांत |
|---|---|---|---|---|
| ऋग्वेद (द्वितीत आवृत्ति) | ५ रु० | १ रु० | -॥- | १॥- रु० |
| यजुर्वेद (शुक्ल वाजसनेयी) | २ " | -॥- | -।- | -॥।- |
| सामवेद | ३ " | -॥- | -।- | -॥।- |
| अथर्ववेद | ३ " | १ रु० | -॥- | १॥- |
| | एकूण १३ रु० | ३ रु० | १॥ रु० | ४॥ रु० |

या चारहि संहितांची आगाऊ ट० ख० शिवाय किंमत ६॥ रु० आहे व ट० ख० ३ रु० आहे; टपालाने चारहि संहिता मागविणारांनी ९॥ रु० म० ऑ० ने पाठवावे. रेल्वेने मागविणारानी प्रत्येक गटासाठी ७॥ रु० पाठवावे. ( यांत दोन वेळचें पॅकिंग -॥- व -॥- दोन वेळच्या रजिस्ट्रेशनसाठी आहेत. ) त्यांचीं पुस्तकें To Pay रेल्वेपार्सलने पाठवूं. **ऋग्वेद छापून होईपर्यंतच या चार वेदसंहिता ६॥ रु० स मिळतील. ( ट० ख० किंवा रे० खर्च निराळा पडेल. ) पुढे किंमत ७॥ रु० होईल; तरी वेदप्रेमी ग्राहकांनी त्वरा करावी.**

व्यवस्थापक– स्वाध्याय-मंडल, औंध ( जि० सातारा )